# THE ADVENTURES

OF

# GIL BLAS

BOOK I.

TRANSLATED FROM ENGLISH INTO MARATHI

BY

VISHNU JÍVÁJÍ PÁGNÍS

BOMBAY:

PRINTED AT THE "NATIONAL PRESS."

1871.

# जिल्ब्लास चरित्र

पुस्तक १ लें.

त्याचें इंग्रजींतून मराठी भाषांतर

विष्णु जीवाजी पागनीस.

ह्यांनीं केलें.

मुंबई येथें

“[illegible],” छापखान्यांत छापिलें.

सन १८७१

माझे परम मित्र आणि स्वप्रांतबंधु, रा.
रा. घनश्याम नीळकंठ नाडकर्णी,
मुंबई युनिवर्सिटीचे बी. ए.
एल. एल. बी, मुंबई हैं
कोर्टाचे वकील आणि
मुंबईतील सरकारी
मराठी शाळां
वरील
डेप्युटी इन्स्पे-
क्टर, ह्यांस, आह्मां
उभयतां मधील शुद्ध
मैत्री व ममता आणि त्यांचे
सहिष्णुता, व कर्तव्यदक्षता इत्यादि
गुण ह्यांविषयीं मान्यतादर्शक बुद्धीनें
प्रीति पुरःसर हें पुस्तक नजर केलें असे.

भाषांतरकर्ता.

# प्रस्तावना

---

सांप्रत नाटकें व कादंबऱ्या इत्यादि मनोरंजक कल्पित गोष्टींच्या वाचनाविषयीं आपल्या लोकांस फारच अभिरुचि जडत चालली आहे. वाचनाच्या हौसेची पहिली मजल अशाच प्रकारच्या ग्रंथांनीं पुरी होते व प्रथमतः असेच ग्रंथ त्या हौसेला वेग देतात, हा नियम साधारणतः लोकसमुदायाच्या मोठ्या भागाच्या लेखन वाचनासंबंधी इतिहास लक्षांत घेतला, तर सहज दिसून येतो. मोठमोठ्या शास्त्रीय विषयावरील ग्रंथांपासून मानवी प्राण्याच्या ज्ञानवृद्धीस जितकें साह्य मिळतें, तितकें अशा गोष्टींच्या ग्रंथांपासून मिळणार नाहीं, हें तर निश्चित आहे; तथापि, ज्या अर्थीं नीति, उत्तम रीति, नित्यव्यवहाराचें ज्ञान, विचारसरणीची योग्य व्यवस्था, लक्षपूर्वक अवलोकन, भाषणरसिकता, सहवासविषयक नियमांचें दर्शन, व प्रापंचिकचिकित्सा इत्यादि गोष्टींचा समावेश अशा प्रकारच्या ग्रंथांतही होत असतो, त्याअर्थी जोपर्यंत या गोष्टींची अवश्यकता राहाते, तोंपर्यंत हे ग्रंथ निरुपयोगी, असें मानतां येत नाहीं. लोकसमुदायाला त्यांजकडून यथाशक्त्या जी मदत मिळावयाची, ती मिळते. दुसरें असे ग्रंथ कोणत्याही एका विशेषकाळींच उपयोगांत आणतां येतात असेंही नाहीं. विवेच्या

योगाने मानवी समुदायांत ज्ञान व विचारशक्ति हे गुण जसजसे प्रसरत जातात, तसतसें अशा ग्रंथांचें स्वरूपही बदलतां येऊन, ज्या ज्या काळीं जसजशी रुचि उद्भवते, त्या त्या काळीं तसतसे हे ग्रंथ रुचिपात्र होतात. ही गोष्ट सांप्रत उदाहरणानीं स्पष्ट केली पाहिजे असे नाहीं: कोल्ह्यांकुत्र्यांच्या गोष्टींपासून मोठ्यामोठ्या राज्यप्रकरणीं कारभारांपर्यंत ह्या ग्रंथातील विषयांचा मजल पोचली आहे; तात्पर्य, सृष्टिसौंदर्य आणि मानवी स्वभावाची गति ह्यांचे ज्ञान अशा प्रकारच्या ग्रंथांपासूनही संपादन करतां येते. यासाठीं याचा उपयोग सर्वदा व्हावयाचा असा तर्क करण्यास आधार सांपडतो.

आपल्या देशांत संस्कृत भाषेचा उत्कर्ष होता, तोंपर्यंत असे ग्रंथ उदयास आले; नंतर त्या भाषेचा लोप होत चालला, तेव्हां सर्व प्रकारच्या नवीन ग्रंथांची गति कुंठित झाली, किंबहुना गतिच राहिली नाहीं असें ह्मटलें तरी चालेल. सांप्रत आपल्या देशांत असंख्य भाषा चालू आहेत. आपली राष्ट्रीय ह्मणून कोणतीही एक विशेष भाषा नाहीं. विद्यांस उत्तेजन देणाऱ्या इंग्लिश लोकांच्या हातीं आपल्या देशाचें स्वामित्व आणि आपल्या लोकांच्या उत्कर्षापकर्षाची जिम्मा गेल्या पासून आमचे अनेक प्रकारचे फायदे होत आहेत, यातच आपली मूळ पुरातन भाषा संस्कृत, तिचा पुनरुद्धार होत असून तद्द्वारें आपल्या महाराष्ट्रादि देश भाषांस उत्तेजन मिळत चाललें आहे,

हाही एक फायदा होत आहे. सांप्रत आपल्या लोकांला आपआपल्या देशभाषेंत नवीन ग्रंथ लिहिण्याची हौस होत चालली आहे, ह्या गोष्टीचें कारणही हेंच आहे. अशा समयीं स्वभाषेचा उत्कर्ष इच्छिणाऱ्या व लेखन वाचनाची हौस बाळगणाऱ्या लोकांस यथाशक्त्या लिहिण्याची हौस व्हावी, हें स्वाभाविक आहे.

साधारणपणें वाचतां वाचतां जितकें समजलें व गोड वाटलें, तितक्यानेंच आनंद मानणाऱ्या वाचकांचा ग्रह बहुधा असा असतो कीं, अशा प्रकारच्या मनोरंजक लेखनांत बहुधा अद्भुत रसाची चंगळ असली पाहिजे. सांप्रत आपल्या लोकांत जे असे ग्रंथ वाचणारे आहेत, त्यांत वर लिहिलेल्या प्रतीच्या लोकांची संख्या मोठी आहे, ह्यासाठीं ते आपल्या ग्रहाला अनुरूप असा विषय ह्मणजे अद्भुत रसानें भरलेल्या कथा, गोडीनें वाचतील, हें खरें आहे; तथापि मानवी प्राण्याच्या मनाला जसें वळण मिळतें, तसें तें तयार होतें, हा नियम लक्षांत घेऊन अद्भुतरस, कीं ज्यांत पुष्कळ असंभाव्य प्रकारांचा समावेश होत असतो, व त्यांचा ठसा वाचकांच्या मनावर उमटतो, त्याविषयीं विशेष श्रमांत न पडतां सृष्टिनियमास अनुसरून घडणाऱ्या संभवनीय प्रकारांचे स्वरूप वाचकांच्या नजरे पुढें उभें करून त्यानां हुशार राखणें, ह्या गोष्टींकडे लेखकांनीं विशेष लक्ष द्यावें, हें अधिक अपेक्षित आहे.

फ्रेंच, इंग्लिश इत्यादि पश्चिमे कडील सुधारलेल्या देशभाषांतही अशा कल्पित कथांचीं पुस्तकें असंख्य

झालीं आहेत व होत आहेत. ह्यांतील विषय कोणत्याही काळाच्या चालू स्थितीस अनुलक्षून असतात व त्यांपासून ज्ञान व शिक्षण हींच चांगलीं मिळतात. मानवी प्राणी कांहींसा स्वबुद्धीनें, कांहींसा दुसऱ्याचें पाहून ऐकून, कांहींसा विचारून समजून याप्रमाणें सुधरत जातो; यासाठीं परभाषेतील ग्रंथ ह्या पुस्तकांचें भाषांतर झालें, तर तें हितावह आहेच. एकादा दुसरा नवीन विचार सांपडतो, व त्याच्या भाषांतरापासून भाषेस तेवढी मदत पोचते, शब्दशक्ति वाढते आणि परभाषेतील विषयरचनेचें स्वरूपही समजतें.

**जिल्ब्लास चरित्र** ही मनोरंजक कल्पितकथा प्रथमतः फ्रेंच भाषेंत रचिली गेली; नंतर ती आपल्या आकर्षक गुणांच्या वेगानें फ्रेंच भाषा जाणणाऱ्या गुणग्राही इंग्लिश वाचकांच्या रुचीस पात्र झाली; त्यावरून आपल्या इतर इंग्लिश बांधवांची साहजिक जिज्ञासा तृप्त करण्यासाठीं मिस्तर **तॉबियस स्मॉलेत** यांनीं ह्या कथेचें भाषांतर इंग्लिश भाषेंत केलें. हे भाषांतर माझ्या परम मित्रांपैकीं एका मित्राच्या द्वारें मला वाचावयास मिळालें; तें वाचीत असतां मानवी आयुष्याच्या नित्यक्रमांत घडून येणाऱ्या संभवनीय गोष्टींची यथातथ्य रेखणी, निरनिराळ्या प्रकारांच्या परस्पर संयोगानें घडणाऱ्या परिणामांचें दर्शन, वाचतां वाचतां आपल्या नित्य व्यवहारांतील गुणावगुणांविषयीं गंभीरपणें विचार करण्याकडे आपल्या मनाची प्रवृत्ति व्हावी, अशी चटकेदार रचना आणि लक्षपूर्वक वाचन-

रूप मंथनाने अंत:स्थित उपदेशामृत बाहेर काढून याच्या सेवनाने मधून मधून आपल्या ज्ञाननाड्यांस हुशारी करून आल्हाद व्हावा, असे आंतील उपकथांचे संबंध व परिणाम, इत्यादि गुण लक्षात आले; त्यावरून याचे महाराष्ट्र भाषेत भाषांतर झाले, तर भाषांतर कर्त्या- कडून आपल्या देशबांधवांची थोडीसी सेवा घडेल, असे वाटून त्याच्या प्रथम पुस्तकाचे हे भाषांतर मी केले आहे.

जिलब्लासाचे सगळे चरित्र ह्या एकाच पुस्तकांत सपत नाही; याच्या पुढील चरित्राचा समावेश दुसऱ्या कित्येक पुस्तकांत झाला आहे व त्या सगळ्या पुस्तकां- चा मिळून इंग्लिश भाषेत एकच ग्रंथ आहे. मी दुसऱ्याही पुस्तकाचे भाषांतर चालविले आहे व मानवी विचाराचा उत्तम व्यवस्थापक व सफलकर्ता जो पर- मेश्वर त्याच्या कृपेने सर्व भाषांतराचे काम योग्यवेळीं माझ्या श्रमाने समाप्त होऊ, असी अत्यंत लीनतापूर्वक मी त्याची प्रार्थना करतो.

हे भाषांतर मी सर्वत्रच शब्दश: केलेले नाहीं. महाराष्ट्र भाषेच्या सरणीस जुळण्याजोग्या रीतीने व मूळ भाषेतील भावार्थ राखून सुज्ञा प्रकाराने केले आहे. क्वचित्स्थलीं गरज वाटली नाहीं, ह्मणून एकादे दुसरे वाक्य सोडलेले सांपडेल व कित्येक स्थलीं गर्भा- र्थाच्या स्पष्टीकरणासाठीं एकादे दुसरे पदरचेंही वाक्य घातलेले आढळेल. विशेषनामें मूळभाषेत जसीं होतीं, तसींच राखलीं आहेत; पण यांचा वर्णोच्चार ती भाषा

न जाणणारांच्या जिव्हेस अधिक त्रास पडूं नये, म्हणून मूळ उच्चार आणि त्या लोकांकडून जो उच्चार झाला असता, तो उच्चार हे परस्पर जवळ जवळ येत, असा सुलभ राखला आहे.

हे माझे पहिलेच श्रम आहेत, तेव्हां वाचकांनीं उदारमनानें त्यांचे ग्रहण करावें.



# जिलब्लासाची वाचकांस सूचना

अहो वाचकांनो! माझ्या मित्रांनो, माझ्या चरित्राच्या वाचनास आरंभ करण्यापूर्वी मी तुम्हांला एक लहानशी गोष्ट सांगतें, ती ऐका.

दोन विद्यार्थी पिनाफिल एथून सालामांकास जाण्यासाठीं सोबतीनें निघाले. चालतां चालतां ते थकले व तृषाक्रांत झाले, म्हणून रस्त्यावर पाण्याच्या एका झऱ्यापाशीं थांबले. आपली तृषा भागविल्यावर ते उभयतांही कांहीं वेळापर्यंत तेथें विश्रांति घेत बसले असतां, जवळच जमिनीच्या सपाटीशीं सपाट अशा एका संगमरवरी दगडावर सहजावृत्ति त्यांची दृष्टि गेली. ह्या दगडावर कांहीं लेख खोदलेला आहे, असेंही त्यांनीं पाहिलें; पण त्या लेखांतील अक्षरें, कालगतीनें व त्या झऱ्याशीं पाणी पिण्यासाठीं जे कळप येत, त्यांच्या जनावरांच्या तुडवणीनें कांहींशीं झिजलीं होतीं, त्यामुळें स्पष्ट दिसत नसत; तथापि त्या विद्यार्थ्यांनीं तो दगड धुवून स्वच्छ केला, तेव्हां कांहीं श्रमांतीं हा पुढील लेख त्यांना वाचतां आला:—"एथें **सनदीवैद्य पीतर गार्शास ह्याचा आत्मा पुरलेला आहे.**"

ह्या दोघां विद्यार्थ्यांपैकीं जो धाकटा होता, तो अमळ गाफल व बेफिकीर होता. त्यानें तो लेख पाहतांच मोठ्यानें ओरडून म्हटलें:— 'वाहवा! खूप

बहार ! "ज्यो आत्मा पुरलेला आहे"........३... आत्मा पुरलेला ! ...... ह्या गमती लेखाचा खरा कर्ता कोण होता, ते कळते तर बरे होते.' ह्याप्रमाणें याने या लेखाची निर्भर्त्सना केली व आपल्या इष्टापुढें याच्या या लेखांतील अक्षरवटिकेचा खुलासा करण्यास सवडच नाहीं. तो नाक मुरडल्यासारखें करून जायाला उठला. याचा सोबती याहून अधिक ज्ञानी व शोधक होता; तो आपल्या मनांत ह्मणाला.--'ह्या दगडाखालीं कांहीं तरी गूढ आहे; मी थांबेन, आणि याचा खुलासा करीन.' याने आपल्या सोबत्याला जाऊं दिलें आणि निरखून त्यानें आपल्या चाकूच्या अग्रानें त्या दगडासभोंवतीं खणून तो वर काढला. खालीं पाहतो, तों त्याला एक चर्मी पिशवी सांपडली. ह्या पिशवींत शंभर डुकत भरले होते व एक चिठ्ठी होती. त्यानें ही चिठ्ठी वाचली, तेव्हां हा पुढील मजकूर त्याला आढळला: "तू कोणीही अस, तुला ह्या खोटींत लेखाचा अर्थ शोधून काढण्याजोगी बुद्धि आहे खरी; या साठीं मी आपल्या द्रव्याचा ज्या रीतीनें उपयोग केला, त्याहून तू चांगला उपयोग करशील, ह्मणून मी तुला माझा वारस करतो !" तो विद्यार्थी आपल्या शोधक बुद्धीच्या योगानें विजयी होत्साता मोठ्या आनंदानें तो सनदकरी वैद्याचा आत्मा आपल्या खिशांत घालून सालामांकास चालता झाला. जातांना त्यानें तो दगडही जसा होता, तसा परत लावून ठेवला;

# जिल्ब्लास चरित्र.

## पुस्तक पहिलें.

---

### भाग १.

### जिल्ब्लासाचें जन्म व शिक्षण.

माझा बाप ब्लास हा संतिलन एथील रहाणारा होता. स्पेन दरबारांतील लष्करी खात्यांत बराच काळ नोकरी करून तो आपल्या गांवीं राहायाला आला, व एथें त्यानें जनानखान्यांतील एका दासीशीं लग्न लाविलें. हिच्या वयाचें दीड तप उलटून गेलें होतें; अर्थात् उभयतांचें लग्न झाल्यापासून दहा महिन्यांनीं माझें जन्म झालें. नंतर तीं ओविडो एथें राहायाला गेलीं. या ठिकाणीं माझ्या आईनें एका श्रीमान बाईचें दासत्व पत्करलें व माझ्या बापालाही त्याच्या योग्यतेनुरूप खासबरदारीची जागा मिळाली. या दंपत्याला त्यांच्या नोकरीच्या स्वरूपा प्रमाणें जो मुशाहिरा मिळे, त्याशिवाय दुसरा कसलाच उपराळा नव्हता; तेव्हां या मोजक्या प्राप्तींत कुटुंबाचा उदरनिर्वाह चालवून माझ्या विद्याभ्यासाकडे खर्च करण्यास त्यांला कोठून सामर्थ्य असणार ! अर्थात् अशा स्थितींत मला चांगलें शिक्षण मिळण्याची मारामारीच होती. परंतु त्याच शहरांत जिलपिरेझ नांवें माझा मामा धर्मोपदेशकाच्या जागीं

होता; त्याच्या कृपेनें हें अरिष्ट थोडेंसें टळल्यासारखें झालें. जिल्पिरेज हा माझ्या आईचा वडील भाऊ व माझा धर्मपिता होय. त्याची ती वामन मूर्ति—साडे-तीन फुट उंच, पण जितकी तुमच्या कल्पनेची धांव पोचते, तितकी लठ्ठ आणि दोन्हीं खांदां मध्यें रुतून गेलेलें डोकें, इतका आकार तुह्मी आपल्या मनांत आणा, ह्मणजे त्याच्या वर्णनाविषयीं अधिकसें भान-गडींत पडणें नलगे. त्याच्या दुसऱ्या गुणांविषयीं विचाराल तर, तो धर्मकर्मनिष्ठ मनुष्य पडल्यामुळें सुखानें राहाण्याहून दुसऱ्या कसल्याच गोष्टींची विवं-चना करीत नसे. सुखानें रहाणें, या सदरांत कसर न करतां मद्य मांसाच्या यथेष्ट सेवनानें तृप्त असणें, या गोष्टीचाही समावेश मी करतों, असें समजा. त्याच्या दैवानें त्याची कोठीही अशी तशीच नव्हती, ह्मणून हें सुखानें रहाणें त्याला पुरवत असे.

मी लहान असतांनाच त्यानें मला आपल्या घरीं आणलें व मला लहानाचें मोठें करण्याप्रीत्यर्थ परिश्रम काढले. माझा चलखपणा त्याच्या नजरेस आल्यावरून माझ्या बुद्धीस चांगला संस्कार असावा, असा निश्चय त्यानें केला. त्यानें मला एक पहिलें पुस्तक आणून दिलें, आणि मला नुसतें वाचायास शिकविण्याचें काम पत्क-रलें. हें काम जसें माझ्या हिताचें होतें, तसें त्याच्याही पथ्यावर पडण्यासारखें झालें. कारण मला मार्झी अक्षरें शिकवीत असतां, त्याचाही अभ्यास कीं, जो फारसा पडतवार झाला नव्हता, त्याची उजळणी होत चालली;

आणि धर्मसंबंधी नित्यकीर्तनाचें पुस्तक तो घडघडां वाचायाला शिकला. ही शक्ति त्याच्या अंगीं पूर्वी कधींच नव्हती. खर्च वांचावा म्हणून त्यानें मोठ्या आनंदानें मला लातिन शिकविलें असतें, पण अरेरे! गरीब बिचारा जिल पिरेज! आपल्या सगळ्या आयुष्यांत त्यानें लातिनाचीं मूळ तत्वेंही संपादन केलीं नव्हतीं. आतां त्याचे सर्व सोबती त्यासारखेच अज्ञान किंवा सर्वांत हाच अज्ञान होता, ह्याबद्दल माझ्यानें कोणताही खास प्रकार सांगवत नाहीं. कारण दुसरे सोबतीही तसे अज्ञान असण्याचा संभव नव्हता असें नाहीं; तथापि सर्वांत जिल पिरेजच अज्ञान होता असें मानलें, तर फारसें आश्चर्य नाहीं. मी असें ऐकिलें होतें व तें खरें होतें कीं, जिल पिरेजाला आपल्या विद्वत्तेच्या योगानें धर्मोपदेशकाचा हुद्दा मिळाला नव्हता, पण कित्येक * धर्मभगिनी विरक्त बायांचा हा शहाणा कारभारी होता, व ह्या बायांच्या धर्मानें ह्याला तें काम मिळालें होतें. त्या परोपकारी बायांच्या परिश्रमानें जिल पिरेजाला परीक्षा देण्यासाठीं खटा-टोपीचा संस्कारही भोगावा लागला नव्हता.

यासाठीं मला एकाद्या शिक्षकाच्या ताब्यांत दिल्या वांचून गत्यंतर नाहीं, असें त्याला वाटलें. त्यानें डाक्टर गोदिनिज् नामें एका पंडिताकडे मला पाठविलें. ओविडो शहरांतील सर्व पंडितांत गोदिनिज हा महान्

* रोमन क्याथॉलिक धर्मांतील ब्रह्मचर्य व्रतानें राहणाऱ्या अविवाहित स्त्रिया.

विद्वान् पंडित होता, असें तेथील लोक मानत. ह्या पंडिताच्या शिक्षणानें मी इतका सुधारलों कीं, पांच किंवा सहा वर्षें संपल्यावर माझ्या अंगीं ग्रीक भाषेंतील एकादा दुसरा ग्रंथ वाचण्याची शक्ति आली; आणि लातिन भाषेंतील काव्यांतही चुटपुटती गति झाली. आद्यविद्यांचा अभ्यास चालवून आणखी तर्कशास्त्रांतही मी मन घातलें, तेणेंकरून मी चांगला खाणाख व पट्टीचा वादी झालों. आतां कोणत्याही विषयावर मला वादविवाद करण्याची इतकी चटक लागली, कीं राजाच्या कोणत्याही रयतेस—ओळख असो किंवा नसो—भर रस्त्यावर मी थांबवावें आणि वादाचें कोणतेंही कूट पुढें करावें. कधीं कधीं मी एकाद्या ऐरिश मेळ्यांत जाऊन वादास बसावें, कारण त्यांना ह्या गोष्टीचा कंटाळा नसे. हीसेसारखा खूप वादविवाद व्हावा तो एथेंच. कसे कसे हावभाव! कशा कशा चेष्टा! कशा कशा वाकोल्या! कसे कसे आळेपिळे! वादविवाद करतानां जी कांहीं आमची अवस्था होई, ती विचारूं नका. सर्वांगास स्फुरण यावें, डोळ्यांतून जशा काय आगीच्या ठिणग्या उसळाव्या, आणि तोंडावाटे फेस निघावें! आम्ही तत्ववेत्ते पंडित होतों, असें ज्याला माहीत नव्हतें, त्याणीं आम्हाला खरोखर विक्षिप्त माणसांच्या वर्गांत गणिलें असावें.

पण तें कसेंही असो, ह्या शहरांत माझ्या विद्वत्तेचा बराच लौकिक पसरला. माझ्या मामालाही संतोष झाला; कारण त्याला असें वाटलें कीं, आतां आपण

लवकरच जिल्ब्लासाच्या कर्जांतून मुक्त होईन; व असें त्याला वाटावें, हें रास्त होतें. एका दिवशीं तो ह्मणाला;—'जिल्ब्लास, इकडे ये, तूं आतां नामी गडी झाल्यासारखा दिसतोस. तुझ्या वयाचीं सतरा वर्षे उलटून गेलीं; तूं शाहाणा मुलगा आहेस; आतां तूं हुशारी धर आणि ह्या जगांत उघड दशेस ये. माझ्या मनांत तुला सालामांका एथील युनिवर्सिटींत पाठवावें असें आहे. तूं आपल्या बुद्धिकौशल्यानें सहज चांगला हुद्दा मिळवशील. वाटखर्चासाठीं मी तुला कांहीं * धुकत देईन व माझा खेचरही तूं घे; सालामांकास पोंचल्यावर हा खेचर विकला, तर दहा किंवा बारा §पिस्तोल किंमत येईल; आणि इतकी पुंजी तुजकडे असली, तर नोकरी मिळे पर्यंत चरितार्थ चालवून राहायाला नड पडणार नाहीं.' या सूचनेहून दुसरी कसलीच सूचना मला अधिक प्रिय झाली नसती: कारण जगांत हिंडून फिरून आयुष्यक्रमाचा थोडासा अनुभव घ्यावा, असी मलाही मरणाची उत्कंठा होती. मला संतोष झाला खरा, पण संतोषाचें चिन्ह मामाच्या नजरेस पाडण्याजोगा मी मूर्ख झालों नाहीं. जेव्हां निघण्याची वेळ आली, तेव्हां मी मामाचा वियोग होतो ह्मणून त्याचा निरोप घेतांना अत्यंत दुःख झाल्याबद्दल असा काय शाहाणा केला कीं, त्या बिचाऱ्याच्या सात्विक मनाला लागलाच पाझर सुटला, आणि

---

* स्पेन देशांतील एक चलनी नाणें.

§ स्पेन देशांतील एक चलनी नाणें.

तो आपल्या डगल्याच्या गजल्यांत हात अधिक अधिक खोल घालूं लागला. माझ्या इवल्याशा ढोंगी अंत:करणांत कोणकोणते व्यापार चालले होते, त्यांची थोडीशी कल्पना जर त्याला झाली असती, तर त्याचा हात गजल्यांत इतका खोल गेला नसता. निघून जाण्याच्या पूर्वी मी आपल्या माता पितरांची रजा मागायास गेलो, तेव्हां सदुपदेशरूप देणगीच्या रेलचेलीने त्यांनी मला न्याहाल केलें. 'तूं आपल्या मामाचे उपकार स्मर, ईश्वराकडे त्याचें बरें माग, जगांत प्रमाणिकपणे वाग, कोणत्याही दुष्कर्मास प्रवृत्त होऊं नको, आणि दुसऱ्याच्या द्रव्याचा अपहार करूं नको;' असा त्यांनी मला बोध केला. याप्रमाणे बराच वेळ बोधनिरूपण झाल्यावर त्यांनी मला आपलीं आशीर्वचनें बक्षीस केलीं; हीच कायती माझी वाटरोटी आणि हीच कायती माझी आस्था. माझें बक्षीस मला मिळाल्या बरोबर मी आपल्या खेचरावर स्वार झालों आणि शहराच्या वेशीबाहेर निघून आलों.



## भाग २.

**पिनेफ्लोर एथे जातानां रस्त्यावर जिल्ब्लास घाबरतो:—त्या शहरांत पोंचल्यावर कोणकोणते प्रकार घडतात:—आणि तो ज्या लोकां बरोबर रात्रीं जेवला, त्या लोकांची वर्तणूक.**

**हा मी आतां ओविडो शहराच्या पैल बाजूवर आहें;**

माझा रस्ता पिनेफ्रोर शहरास जातो; माझ्या सभोंवतें जग पसरलें आहे; सांप्रत मीच माझा चाकर व मीच माझा धनी झालों आहें; एक रोडकासा खोडकर खेचर आणि रास्तपणें' मिळालेले चाळीस व माझ्या प्रतिष्ठित मामाच्या गजश्यांतून ढोंगानें लुटून काढलेले दुसरे कांहीं धुकत, इतकी जिनगी मजकडे आहे. पहिल्यानें मी माझ्या खेचरास, तो जसें जाईल तसें जाऊं दिलें; ह्मणजे फार धिमी चाल धरली. मी लगाम मोकळी सोडली आणि डोईची टोपी काढून तींत माझे धुकत उलथून पालथून मोजूं लागलों. जन्मादारभ्य मी एवढी पुंजी कधींच पाहिली नव्हती, ह्मणून ह्यावेळीं आनंदाच्या अतिशयानें मी इतका भुरकटल्यासारखा झालों कीं, ते धुकत पुन: पुन: टोपींतून बाहेर काढावे, पुन: पुन: मोजून आंत घालावे, तळहातावर घेऊन त्यांजकडे न्याहाळून पहावे व मोजून परत टोपींत टाकावे. अशा मोजण्याच्या, टाकण्याच्या व पाहाण्याच्या सुमारें वीस आवृत्ति झाल्यावर एकाएकींच माझा खेचर शीर व कान उभारून हमरस्त्यावर मध्येंच खुंटसा उभा राहिला. याला कांहीं तरी कारण असावें खरें, असें वाटून मी आसपास पाहूं लागलों, तों जमिनीवर उलथी पडलेली एक टोपी मोठमोठ्या मण्यांच्या एका माळेसहित दृष्टीस पडली. त्याच वेळीं, 'हे सन्मान्यधन्या, एका गरीब पंगू शिपायाची दया आण! धर्माकरितां ह्या टोपींत कांहीं दुडू टाक; परलोकीं ह्या धर्माचे फळ तूं अक्षय्य

भोगिशील.' असे दीनवाणे शब्द माझ्या कानीं पडले. हा ध्वनि ज्या बाजूनें आला, त्या बाजूस मी पाहूं लागलों. तों समोरें वीस किंवा तीस कदमांवर एका दाट झाडींत शिपायासारखें कोणी माझ्या नजरेस पडलें. त्यानें लांकडाच्या एका तिकट्यावर एक लांब दांड्याची नळी चढवून मजवर मारगिरी धरली आहे, असें मला दिसलें. हा भयंकर देखावा पाहून मला कांपरें सुटलें, पण माझ्या धर्मनिष्ठ मामाकडून मिळालेल्या पवित्र ठेवीची काळजी मला माझ्या जीवाहून अधिक पडली. मी तेथेंच थांबलों आणि प्रथमतः माझ्या बुकतांची खबरदारी घेऊन थोडकासा खुर्दा बाहेर काढून घेतला. नंतर त्या टोपीजवळून जातांनां तो खुर्दा मोजून सबकून आंत टाकला, कारण त्या टोपीचा अनादर करण्यास मजसारख्या साळढाळ निरुपद्रवी लोकांतून कोणाचीच माय व्याली नव्हती. खुर्दा तपशीलवार मोजून सबकून टोपींत टाकण्याचें कारण इतकेंच कीं, त्या शिपायाला, कसा उदार मनानें मी त्याशीं वागलों हें कळावें. माझ्या औदार्यानें तो संतुष्ट झाला व त्यानें मला बरेच आशीर्वादही दिले असावे. निदान त्याच्या टप्यांतून एकदाचा पार पडून जाण्यासाठीं मी आपल्या खेचराला जितक्या टाचा मारल्या, तितके तरी आशीर्वाद त्या शिपायाकडून मला मिळाले असतील. जीव घेऊन पळण्याची मला घाई सुटली खरी, पण माझ्या घाईवांचून त्या खेचराचा कोठला खोळंबा व्हायाला! मी आपणाकडून

ट्याचा मारण्याची शिकस्त केली, पण तो कोडगा पशु कांहीं केल्यानें वळेना. त्यानें आपली मूळ बादशाही चाल धरली. माझ्या मामाच्या वजना त्यालीं हयकत हयकत हळू हळू चालण्याची जी खोड फार दिवसांपासून त्या खेचराला जडली होती, जिच्या योगानें, चौकचाल असे जिला ह्मणतात, ती दवड कशी असते, हें तो पशु अगदींच विसरला होता.

माझ्या पर्यटनांत पुढें ज्या गोष्टी घडल्या, त्या गोष्टींची कल्पना करण्यास वरील मासला अधिकसा बस होत नाहीं. मला असें वाटूं लागलें कीं, सालामांका एथें पोंचेपर्यंत अजून बराच मार्ग क्रमावा लागेल आणि न जाणों, याहूनही अधिक विपरीत असें कांहीं तरी घडून येण्याचा संभव आहे. माझ्या मामानें मला एकाद्या भाडोत्री खेचरवानाच्या स्वाधीन केलें नाहीं, ह्यांत त्यानें फार अविचार केला, असें मला दिसलें. खरोखर ह्मटलें तर, त्यानें तसें करावें हें वाजवी होतें ; पण आपलाच खेचर माझ्या स्वाधीन केला, ह्मणजे रस्त्यावर मला अधिक खर्च लागणार नाहीं, असें त्याला वाटलें असावें. आणि ह्याच कल्पनेनें त्याचा मेंदू भरून राहिल्यामुळें, रस्त्यांत मजवर अशी संकटें गुजरतील, तर त्यांबद्दल कांहीं तरी खबरदारी घ्यावी, या गोष्टीकडे त्याचें लक्ष्य मुळींच गेलें नसावें. यासाठीं एकदा मामाकडून चूक झाली ती झाली, आपण तरी ती आतां दुरुस्त करावी, असें मनांत आणून, चांगल्या नशीबानें एकदाचा पिनेफ्लोर एथें पोंचलों तर,

खेचर परत विकून काढावा आणि एखादा भाडोत्री खेचरवाला पाहून त्या समागमें आस्तोर्गास जावें, असा निश्चय मी केला. आस्तोर्गाहून पुढें सालामांका पर्यंत जाण्यासाठीं हीच तजवीज करायाची गरज नव्हती. ओविडो शहरा बाहेर जरी मी पूर्वी कधींच गेलों नव्हतों, तरी घराबाहेर पडतांना मी थोडीशी माहिती काढून घेतली होती, ह्मणून माझा रस्ता कोणकोणत्या शहरांतून जातो, त्या शहरांचीं नांवें मला ठाऊक झालीं होतीं.

मी पिनेफ्लोर एथें सुखरूप व नेत्तनामी शिवाय येऊन ठेपलों, व एका सुभगशा दिसणाऱ्या भटारखान्याच्या दरवाज्याशीं थांबलों. रिकिबींतून माझे पाऊलही बाहेर निघालें नव्हतें, इतक्यांत घरधनी येऊन माझ्या बाजूस उभा राहिला, आणि त्याणें माझी उठाठेव करण्याची कमाल करून सोडली. त्याणें स्वतः आपल्या हातांनीं माझा बोजा सोडला आणि आपल्या खांद्यावर लटकला; नंतर आमची स्वारी एका खोलींत प्रविष्ट केली, व त्याच्या दुसऱ्या माणसांनीं येऊन माझ्या खेचराला तबेल्यांत नेलें. भटारखान्याचे हे धनी फार बडबडे पण मोठे कावेबाज बाबा होते. विचारल्या पुसल्याशिवाय एकदम आपल्या कुळकथा दुसऱ्याला सांगण्याविषयीं हा सर्वदा सादर असे; इतकेंच नव्हे, पण दुसऱ्याच्या कथाही ऐकण्यासाठीं कमी हुलहुल दाखवी असें नाहीं. कावा हा कीं, पहिल्यानें आपलें मन मोकळें केल्यासारखें दाखवून

श्रोत्यांच्या मनाचे विळे काढावे व त्यांजकडूनही आ-पल्या कथेचा मोबदला मिळण्याची स्वाभाविक इच्छा दाखवून श्रोत्यांचे काळेबेरे काढून घ्यावें, असा जो विशेष हेतु तो साधावा. ह्या भल्या माणसानें एका क्षणाचाही विलंब न लावतां मला आपलें वृत्त सांग-ण्यास सुरू केलें. तो ह्मणाला:– 'महाराज, मला आंद्रूकार्सिन्लो असें ह्मणतात; लष्करी खात्यांत ह-वालदारीच्या हुद्यापर्यंत मी नोकरी केली आहे; सुमारें पंधरा महिने होतील, तेव्हां मी ती नोकरी सोडली. याच संधीस मी एका उपवर मुलीशीं लग्न लाविलें. बायको कांहीं फारशी वाखाणण्या सारखी आहे असें नाहीं; आहे आपली काळी सावळीशी; पण गोड ह्मणून खावें आणि मऊ करून निजावें हें मी चांगलें जा णतो'. ह्याशिवाय दुसऱ्याही पुष्कळ गोष्टी त्याणें मला सांगितल्या व त्या खासगी गोष्टी केवळ मजकडे ह्मणून बाहेर फुटल्या, असें करून दाखविलें. आपण आप-खुषीनें विश्वास ठेवून जसें आपलें वृत्त सांगितलें, तसें मजकडूनही माझें वृत्त ऐकण्याविषयीं आपला हक्क आहे, असें मनांत आणून, स्वत:चा पाल्हाळ संपवून पुरतासा दमही त्याटला नव्हता, इतक्यांत, मी आलों कोठून, जातों कोठें व आहें कोण, इत्यादि सणसणीत प्रश्न मला विचारण्यास त्या बेट्याला उपोद्घाताची ह्मणून कसली ती गरजच लागली नाहीं. हें सर्व त्यानें मला बेधडक विचारलें खरें, पण प्रत्येक प्रश्न विचारतानां त्याणें माझी माफी मागावी, 'महाराज, माझ्या बेड-

गळ विचारण्याने रागावूं नका,' असी वारंवार माझी प्रार्थना करावी व फार नम्रता दाखवावी. सारांश या त्याच्या विचारण्याच्या गोलतेनें व नम्रतेच्या हावभावांनीं मी इतका मोहळून गेलों कीं, माझ्या मनांत असो अथवा नसो, मला त्याच्या प्रश्नांचीं उत्तरें कळमनारीनें दिल्याशिवाय गत्यंतर राहिलें नाहीं. याप्रमाणें शनैः शनैः पण अल्पकाळांतच आह्मां दोघांचेंही खूप जमून गेलें व दोघांमध्येंही बराच वेळ भाषणें झालीं. बोलतां बोलतां माझा खेचर मला विकावयाचा होता व एकादा भाडोत्री खेचरवानास बरोबर घेऊन पुढें जावयाचें होतें, हेंही मी त्याला जाणविलें. एकंदरींत त्यानें माझा बेत पसंत केला खरा, पण रुकार देण्यापूर्वी, वाटसरू लोकांला रस्त्यावर असीं असीं अरिष्टें, तसीं तसीं संकटें प्राप्त होण्याचा संभव आहे., त्यांनीं अशा तऱ्हेनें खबरदारी घेतली पाहिजे, तशा रीतीनें वागलें पाहिजे, इत्यादि शेकडों गोष्टींवर त्यानें एवढें वाग्जाल पसरलें कीं, त्याचा तो रुकार मला गणितानें हुडकून काढावा लागला. पहिल्यानें तर असें वाटलें कीं, ह्याची वातनकी रेलचेलच ऐकावी, माझें काम कांहीं ह्याच्या हातून होणार नाहीं; पण सगळ्या भाषणांतील सारांश शेवटीं इतका निघाला कीं, ' जर तुम्हांला आपला खेचर विकायाचा आहे तर, मी एक विश्वासु गिऱ्हाईक देईन; ' असें त्यानें मला सांगितलें. ' तर कृपा करून त्या गिऱ्हाइकाला मजकडे आणा, इतके शब्द माझ्या तोंडावाटें निघाले, तोंच त्या बा-

हादूर माणसानें त्याला दतकन् मजपुढें आणून उभें केलें. ह्या गिन्हाईकाच्या प्रामाणिकपणाबद्दल त्यानें जी तारीफ केली, तिच्या योगानें मी तात्काळ फुलजी झालों. आह्मी त्रिवर्गही आंगणांत गेलों. गिन्हाईकानें प्रथमतः माझ्या खेचराची चाल पाहून नंतर खालवर दृष्टीनें त्याला नखशिखान्त तपासलें. बेटा खेचराला कांहीं पसंत करीना. मालाला झिट्‌काखन व हिणवल्यासारखें करून सौदा अल्प किमतींत पाडणें हें ह्या लोकांचें कसबच होय; तेव्हां माझ्या खेचराला त्यानें पसंत केलें असतें, ही आस्थाच नव्हती. माझी ती कथा काय? प्रत्यक्ष आपल्या बापास किंवा गुरूसही त्यानें तसेंच केलें असतें. शेवटीं त्यानें एकदम असा निवाडा दिला कीं, 'खेचर तर निखालस अवलक्षणी आहे व खेचरजातींत ह्मणून जितकीं दुर्लक्षणें असण्याचा संभव आहे, तितक्यांहींकरून हा परिपूर्ण आहे.' असें ह्मणून लागलीच घरधन्याकडे मान वळविली व, 'कांहो! मी जें ह्मणतों तें काडीमात्र तरी खोटें आहे काय?' असें त्याला विचारून जयल्यातेथेंच त्याची साक्ष दिली. एक सिद्ध व दुसरा साधक! दोघांलाही आपला स्वार्थ होताच, तेव्हां परस्पर अंतर देवात कशाला! नंतर उदासीनपणें व निरपेक्ष मुद्रा दाखवून तो मला विचारतोः— 'बरें, तुह्मी तरी या जनावराची किंमत काय धारितां? हें कृपा करून शुद्ध मनानें मला सांगा.' पूर्वीपणें आपण ज्याला प्रामाणिक व चांगला अश्वपरीक्षक असें मानलें, त्या कार्सिकोनें उत्तम साक्ष दिल्यावर

मग त्याला दुसरे काय सांगायाचें होतें ? माझा सर्व भरवसा तुह्मांवर आहे, जी किंमत तुह्मी ठरवाल ती मला मान्य आहे, असें उत्तर मी त्याला दिलें. ह्यावर थोडेसें अडचणींत पडल्या सारखें दाखवून ह्मणाला, 'का आह्मांवरच सोंपवून आमची पत पाहातां काय ?' ह्याप्रमाणें भलाइचा डौल घालून त्या लुच्चानें माझ्या मामाचा अजमास जो दहा बारा पिस्तोलांपर्यंत होता, तो एकीकडे ठेवून एकदम उंचें नाकानें मला अधिक तर तीन धुकत देऊं केलें. मलाहि हा व्यवसाय उत्कृष्ट सरिकेवारसा वाटून मोठ्या उल्हासानें मी कबूल केला.

अशी व्यापारी धाट्यानें मी खेचराची पीडा काढून टाकली आणि घरधन्याला बरोबर घेऊन भाडोत्री खेचरखानाकडे गेलों. भाडें व पोटगीबद्दल ठराव करून दुसऱ्या दिवशीं मोठ्या पहाटेस आस्तोर्गास निघून जाण्याचा निश्चय केला व खेचरखानानें वेळेवर माझ्या बिऱ्हाडीं येऊन मला उठवावें असी त्याला ताकीद दिली. ही सोई झाल्यावर आह्मी दोघेहि परत भटारखान्याकडे जाण्यासाठीं फिरलों; चालतां चालतां कोर्सेलोनें त्या खेचरखानाची खासगी हकीकत सांगण्यास आरंभ केला. सगळ्या गांवाच्या बकवा सांगून माझें डोकें उठविल्यावरही तो दुसऱ्या कोणत्र्याशा गोष्टीस आरंभ करणार होता, इतक्यांत दैवयोगानें नीट नेटकासा शिलेदारी बाण्याचा एक माणूस रस्त्यावर भेटला; आणें मोठ्या सभ्यपणानें या माझ्या घरधन्या गळ्याला मध्यें अडचळा आणला. या दोघांलाही

रस्त्यावर बोलत टाकून मी गमत गमत पुढें चालू लागलों, 'दुष्प्रांतृनीयो' हें जें मूर्खांच्या लक्षणांपैकीं एक लक्षण, तें आपल्या अंगीं नाहीं व त्यांच्या बोलण्यांत आपला संबंध बिलकूल नाहीं, अशी मी त्यांची खातरी केली.

भटारखान्यांत परत येऊन ठेपल्यावर मी आपल्या जेवणाची वर्दी दिली. आजची पाळी मासळी भोजनाची होती; पण आमच्या तिजोरीच्या मानानें आम्हाला अंडींच पुरवली. भोजनाची तर्तूद चालली असतां मी घरधनिणीबरोबर भाषणास गुतलों. ह्या बाईला मी पूर्वीं पाहिलें नव्हतें. ती बरीच ज्ञानळबेली व चुळबुळीशी दिसली, त्यावरून तिच्या गंजाला भरपूर गिऱ्हाईकी असावी, असें मला वाटलें असतें, पण ह्या गोष्टीबद्दल तिच्या नवऱ्यानें पूर्वींच फाड केला होता. कवट पोळी तयार करून आणतांच मी भोजनास बसलों; पोळीचा पहिला तुकडा मोडून तोंडांत घालीत होतों, इतक्यांत घरधनी व ज्यानें त्याला रस्त्यावर थांबविलें होतें, तो त्याचा सोबती हे दोघेही आंत आले. ह्या सोबत्याच्या हातांत एक लांब गुप्ती होती व त्याचें वय सुमारें तीस वर्षांचें होतें, असें दिसलें. तो मला काय माझा जीवमान सोबती, अशा हावभावांनीं मजजवळ आला आणि म्हणाला:—गुरुमूर्ति, आपण सांगिलनकर विख्यात शिल्पकार आहां, हें आतांच मला कळलें. ओविडो नगरीचें तें भूषण आणि तलघाम्याची ती खाणी हेंच काय! सर्व

महान् महान् विद्वानांच्याही अग्रपूजेस योग्य, तर्कशास्त्राची केवळ मूर्तिमंत देवता व ज्याची ख्याति एथपर्यंत पसरली आहे, अशा ह्या विद्वच्छिरोमणीच्या दर्शनानें आज माझे डोळे पुनीत झाले.' नंतर घरधनी व त्याची बायको ह्यांकडे वळून ह्मणाला: 'कांहो हें तुमचें दैव उदेलें, त्याबद्दल तुह्मांला कांहींच वाटत नसेल! तुह्मांला हा एक गुणनिधी सांपडला, ह्यांत तिळमात्र संशय नाहीं. हा तरुण गृहस्थ एक ईश्वरी विभूतिच आहे, असें तुह्मी माना.' नंतर धांवत येऊन त्यानें माझ्या गळ्यास मिठी मारली आणि परत ह्मणाला;— 'महाराज, क्षमा करा; आपल्या पूज्य दर्शनानें जो आनंदातिशय मला झाला आहे, तो भुवनत्रयांतही मावेना.'

जसें माझ्या मनांत होतें, तसें पातळ जिभेनें माझ्यानें त्याला उत्तर देववलें नाहीं; शब्द सुचले नाहींत ह्मणून नव्हे, पण त्यानें मला असी मगरमिठी मारली कीं, माझें नरडें अगदी आवळून गेलें; त्यामुळें उसासा टाकण्याची देखील पंचाईत पडली; मग शब्द उमटतो कोठून! तथापि बंधमुक्त होऊन थोडासा सावध झाल्यावर लागलेंच मी त्याला उत्तर दिलें कीं;—'शिलेदारराव, चिमेझांत एथें माझें नांव माहीत झालें आहे, हें मला बिलकूल ठाऊक नव्हतें.' त्यानें पूर्वीप्रमाणेंच मोठ्या चढेपणानें असें प्रत्युत्तर दिलें कीं;—'माहीत झालें आहे! आमच्या आसपास साठ कोसांवर जे जे महान पुरुष होतात, त्या सर्वांची नोंद आह्मी ठेवीत

असतो. एथें आपल्याला एक भेंड असें समजतात ; पूर्वी ग्रीस देशांत जसे सप्त महाज्ञानी होऊन गेले व त्या सत्पुरुषांच्या जिण्यानें तो देश कृतकृत्य झाला, तसीच एकाद्या दुसऱ्या दिवसीं एतद्देशीय विरल पुरुषांत आपली गणना होऊन आमच्या स्पेन देशाची वडाई वाटेल.' हें सुभाषित आटपल्यावर पुनः पूर्वीसारखाच मगरमिठींचा फेरा झाला, व मी अगदी गुदमरून गेलों ; ह्या प्रसंगीं खरें खुरेंच मला असें भय पडलें कीं, न जाणों, अतिस्तुतीचा जो परिणाम झाला, त्यालाच मीं आतां एथेंच पात्र होतों कीं काय! विदूषकाच्या डोळा खालीं ही मरणाचीच पाळी आली, असा धाक मला पडला. मला थोडकेसें व्यवहारज्ञान असतें तर मी ह्या लुच्चाच्या भुलथापीनें फशीं पडलों नसतों. प्रत्येक शहरांत उंडीकवाल्यांचा बराच भरणा असतो ; ह्यांचा धंदा ह्या शहरांत कोणीही पाहुणा आलारे आला कीं, त्याशीं अगदी निकट सलगी ठेवून त्याच्या खर्चानें यथेष्ट तुकडे मोडावे, हा असतो ; पण मी पडलों तरुण, अप्रतीत आणि भाकड पोरगा, त्या मला शुद्ध अनुमान कसलें होतें ! कपाळाचें ! माझा समज अगदीच उलटा गेला. मी त्या भाटाला चांगला व शहाणा माणूससा समजलों आणि आपल्या पंक्तीस जेवायाला बोलाविलें. माझें आमंत्रण आदर पूर्वक स्वीकारून तो म्हणाला :—भः फार चांगली गोष्ट आहे, आपल्या पंक्तीस भोजन करायाला मी एका पायावर सिद्ध आहें ; समजकरून कसलीच ना नाहीं.

मतिलनकर विद्यात त्रिलूब्लास महाराजांच्या पंक्तीचा अलभ्य लाभ आज मला घडत आहे, त्यावरून माझे सर्व ग्रह सांप्रत इष्टस्थानीं आले आहेत, असे वाटतें. परमेश्वरकृपेनें आज माझें दैवच फळफळलें आहे, ह्यांत संशय नाहीं. ह्मणाल तर माझी भूक नाजूक आहे, परंतु केवळ स्नेहबुद्धींत अंतर पडूनये ह्मणून उगीच आपल्या बराबर बसेन; आणि कदाचित् कांहीं खाल्लेंच तर, दुर्मुखलेपणाचा दोष लागूनये, ह्मणून एकादा तुकडा उष्टावीन; कारण आह्मी तत्वज्ञानी पुरूष शरीराची जोगणूक फारशी ठेवीत नाहीत.' इतकें बोलतां बोलतांच त्यानें मजसमोर आपली मांडी मांडली. प्रथमत: राजश्रीची स्वारी कवटाच्या पोळीवर तुटून पडली. ही पोळी त्यानें इतक्या सपाट्यानें गट्ट केली कीं, जसा तो तीन दिवसांचा उपासीच होता. पहिल्यानें पोळीकडे पाहातानांच त्यानें इतक्या तल्लीन दृष्टीनें पाहिलें होतें कीं, त्या बिचाऱ्या पोळीची कालमर्यादा एका चटकीसरशी व्हावयाची होती, असा तर्क तेव्हांच मला झाला होता. ह्यासाठीं कवटाला उदरसमाधि मिळतांच, त्यांच्या मागून त्यांच्या कायदेशीर वारसाला हजीर करावें, अशी वर्दी मी पूर्वीच दिली होती; आणि हें काम इतक्या त्वरेनें बजावलें गेलें कीं, पहिल्या जिनसावर आह्मीं;—नाहीं, क्षमा करा मी चुकलों;—त्यानें शेवटचा रट्टा दिला न दिला इतक्यांत दुसरा जिन्नस मेजावर येऊन थडकला. तथापि ह्यावेळीं त्यानें खाण्यांतच

गढून गेल्याचें चिन्ह दाखविलें नाहीं. पोटांत जसाजसा उबारा येत चालला, त्याप्रमाणानें खाण्याकडे जितकी तत्परता व चपलाई पाहिजे तितकीच ठेवून एकीकडून चर्वणव्यापार व दुसरीकडून माझें स्तोत्र, याप्रमाणें दोनही कामें त्यानें एकदांच तडीस नेलीं. आतां ह्या सर्व प्रकारांनीं मला दोन बोटें स्वर्ग राहिला. भोजनावर प्राशन पाहिजेच. 'निल्क्लासकी जय,' असें म्हणून त्यानें पहिला प्याला झोकला; प्रथमतः अन्नोदक दात्याचा आदर व्हावा, हें बरोबरच होतें. दुसऱ्या प्याल्याच्या वेळीं माझ्या मातापितरांच्या जयजयकाराची पाळी आली; कारण मजप्रमाणें देवदूतासारखा ज्यांना पुत्र, त्यांच्या भाग्याची तारीफ करावी तितकी थोडी, असें त्याला वाटलें. ह्यांत त्यानें आपला साधारण सभ्यपणा दाखविला. प्रत्येक वेळीं त्यानें माझा प्याला भरून ठेवावा, व मला चकाओढीस पाडावें. अशा मजेदारीला दाद देण्यांत मागें सरावें हें गांडू माणसाचें काम होय, असें मलाही वाटून मी दाद द्यावी. चांगचांगल्या बातांचिनानीं मजेदारीही खूप सजून गेली होती, तेव्हां हिमतीनें तिचा उपभोग घेण्यांत मला कांहींच वेडेवांकडे दिसलें नाहीं. त्या खाण्यापिण्यानें व बातांचितांनीं माझी तबियत इतकी लागून गेली कीं, आमचें दुसरें पक्वान्न फडशा होतांच मी घरवाल्याला पोटाशीं मासळी मिळेल तर आणावी, असें सांगितलें. त्या अशाशी भाटाच्या प्रसादानें कार्सिको बाबाची व माझ्या मूर्खत्वाची त्या भाटाची बरीच चंगळ उडाली होती, तेव्हां घरच-

त्यानें मला हळूच उत्तर दिलें कीं. 'आपल्याकडे चांगल्या माशाचें पक्वान्न आहे, पण त्याची किंमत जबर पडेल, ह्मणून तें तुह्मांला पुरवेलसें आपल्याला वाटत नाहीं.' इतक्यांत ह्या माझ्या भोजनभाऊ नम्र सेवकानें फार रागीट मुद्रेनें कार्मिलोकडे फिरून ह्मटलें;—'काय ह्मणतां! तुह्मांला पुरवेल? तुझ्या सगळ्या पाकशाळेत कसेंही उंच पक्वान्न असलें, तरी तें जगाविख्यात सनिलनर जिलब्लास महाराजाला पुरवणार नाहीं, असी गोष्ट तरी घडेल काय? हे सर्व तुला अजून शिकायाचें आहे. तो कोठेंही जरी असला, तरी राजेलोकांच्या पंक्तीस बसून भोजन करावें, असी त्याची योग्यता आहे'. घरधन्याच्या मुखांतून जे शेवटचे शब्द निघाले, ते ह्यानें उडवून दिले, तेणेकरून मला आनंद झाला, कारण तो उगी रहाता तर, मला स्वतः घरधन्याला लढी देणें भाग पडतें. त्याचे ते शब्द माझ्या अंतःकरणास किंचित टोचल्यासारखे झाले व मी थोडकासा ताठा दाखवून त्याला ह्मटलें कीं;—'आण तुझें ते पक्वान्न, मग काय होईल तें होवो.' घरधन्यालाही इतकेंच पाहिजे होतें; ते मिळाल्यावर तो लागलाच तयारीस लागला. थोडक्याच वेळांत त्यानें तें पक्वान्न एका सुंदर ताटांत घालून मोठ्या अदबीनें आह्मापुढें आणून ठेविलें. ह्या तृतीय आवृत्तीच्या वेळीं माझ्या स्तुतिपाठकाच्या डोळ्यांत आनंदलहरी चमकूं लागल्या; त्यानें तल्लीन मुद्रा धारण केली; आणि कवटांच्या जमाखर्चाची तोंडमिळणी करतांना जी तत्परता

दाखविली होती, तीच तत्परता या वेळींहि त्याच्या अंगीं संचार करूं लागली, असीं चिन्हे दिसलीं. पण पूर्वीच आकंठमर्याद झाला होता, म्हणून अपकाराच्या भीतीनें शेवटीं त्याला आपले हात आवरावे लागले. पोटभर खाल्यावर आतां आपल्या तमाशाचा शेवटील रंग करून दाखवावा, असें त्याला वाटलें. तो म्हणाला ;—"हे तिलब्लास धन्या, तूं मला आज राजास योग्य असी मेजवानी दिली, तिच्या योगानें मी इतका संतुष्ट झालों आहें कीं, तुला एकादा उपदेशपर शब्द सांगितल्याशिवाय माझ्यानें रहावत नाहीं; माझा उपदेशपर शब्द तुझ्या हितास पडेल, असें मी समजतों. आजपासून पुढें केव्हांही अति प्रशंसेला भुलणार नाहीं, असा आपल्या कानाला खडा लावून घे; परिचयावांचून कोणावर विश्वास ठेवूं नको; कदाचित् तुला दुसरे पुष्कळ लोक भेटतील व ते मजप्रमाणेंच तुला चढवून व खर्चभरीत करून मजा मारतील; किंबहुना मी केलें, त्या पलीकडेही त्यांच्या मजेची मर्यादा पोंचेल; पण दुसऱ्या वेळीं अशा रीतीनें फसला जाऊं नको, आणि अशा लुच्चे लोकांच्या प्रशंसेवरून आपल्याला 'ईश्वरी विभूति,' असें मानूं नको.' याप्रमाणें शेवटच्या सलामीवरतर भाषण करून तो माझा निरोप घेऊन चालता झाला; आणि मी आपलें डोकें खाजवीत तेथेंच तटस्त बसलों.

या उपहासास्पद गोष्टीनें मी इतका खट्टू झालों कीं, तदनंतर पाणउतारा होण्याचे जे जे कठकठीण

प्रसंग मजवर गुजरले, त्या सर्वांत हा प्रसंग मला भारी असह्य झाला. त्या बिलंद लुच्चानें मला असें फसविलें काय! मी कसा रे इतका मूर्ख झालों! इत्यादि विचार मनांत येऊन मी अगदी स्तंभित होऊन गेलों; माझें डोकें जड झालें; पूर्वी आंगांत भरून राहिलेली गर्वाची फुग व हा पाणउतारा, ह्या दोन गोष्टींचा परस्पर मेळ कसा पाडावा, व चित्तास समाधानी कसी आणावी, हें काहींच मला सुचेना. मी ह्मटलें;—तो हरामजादा माणूस वाटसरू लोकांला असेंच फसवीत असतोना? काय त्याची ती काशीकरी विद्या! घरधन्याला रस्त्यावर उभें करून माझें नांव गांव वगैरे सर्व माहिती काढून घेतली, आणि मला मूर्खाला फसविलें! अथवा या दोघानींही मिळून हें मंथकूट घाटलें असावें. आहारे विचाऱ्या जिलब्लासा! तूं अगदीं गलतान फिरे आहेस! कसल्या अचरट डोक्यानें तूं बाहेर पडला आहेस रे! घरच्या घरीं असतास तर बरें होतें. अशा वंचकानीं तुला फसवून उपहासास पात्र करावें काय? ही एक त्यानां चुटकेदार काहाणीच होईल! ती विजेच्या योगानें जिकडे तिकडे पसरेल आणि सर्व लोक बसल्या ठिकाणीं तुझी बचेरी फिरे उडवितील! ओविडो एथें ही वार्ता समजली ह्मणजे तुझे सुहृत्संबंधी लोक व मित्र तुझ्या भावी दिग्विजयाची मोठी उमेद बाळगतील नाहीं काय? तुझ्या कुटुंबाची माणसें तर आपल्या अमूल्य उपदेशाचें चांगलें सार्थक झालें ह्मणून आनंद पावतील! तूं अन्याचाच

लुच्चा, त्या तुला उपदेश काय करावयाचा होता! इत्यादि विचारांनीं मी अगदी संतप्त झालों; दांत ओठ खाल्ले; बोटें मुरडलीं; आणि अगदीं आंधळा बहिरा होऊन गेलों. शेवटीं तशाच स्थितींत असतां खोलीचा दरवाजा ओढून घेतला आणि जाऊन बिछान्यावर पडलों. सर्व रात्र झोंपेशिवाय तळमळलों। पहांटेच्या वेळीं कोठें पायास पानें लागत होते; इतक्यांत खिदमतगार येऊन म्हणाला;—'महाराज उठा, आपल्या वांचून सर्व खोटी आहे.' मी लागलाच धडपडून उठलो व कपडे चढवूं लागलों, इतक्यांत **कार्मिलांगावली** आपली चिठ्ठी घेऊन आंत शिरले; भोजन खर्चाची इतकीशी यादी! लुच्चाच्या नाकावर लाथ मारतो तर बरतें; कारण मी खर्चाचा तपशील पहात असतां तो गळग्रह पूर्वरात्रींचा तमाशा आठवून गालच्या गालीं हंसत होता, असें मी पाहिलें. त्या जेवणाचा एक घांसही मी स्वतः गिळला नव्हता। याबद्दल मोफत एकाचे दोन पैसे भरून अत्यंत लाजिरवाण्या रीतीनें मी आपलें तोंड करून घेतलें आणि बोजा खेचरावर चढवून चालता झालों. जातांना तो उंडीकबाल स्तुतिपाठक, घरधनी व तो भटारखाना, या सर्वांचें भूत होवो असा शाप दिला.

---

## भाग ३.

### रस्त्यावर खेचरवानाचा मोह, त्याचा परिणाम आणि सिला व करिब्दीस ह्या दोन ठाण्याच्या दरम्यान जिब्रल्टासाची स्थिति.

मी एकटाच वाटसरू नव्हतो. **पिनेफ्लोर** एथील दोन तरुण गृहस्थ, **मान्दोनेदो** एथील एक छोटेखान गवय्या,–जो आसपास फिरत होता, आणि **आस्तोर्गा** एथील एक तरुण व्यापारी,–जो **वर्सो** एथें लग्न करून आपल्या बायकोसह परत घरीं जात होता; असे दुसरे वाटसरू होते. थोड्याच वेळांत आमची परस्पर ओळख देख झाली; आणि सोबतीनें जाणाऱ्या वाटसरू लोकांत जसी मोकळ्या मनानें बोलणीं चालणीं व्हावीं, तसीं आह्मांमध्येंही होऊं लागलीं. आपण आलो कोठून, व जातों कोठें हें एकमेकांनीं एकमेकास सांगितलें. नवरी तरुणच होती, पण तिचा रंग इतका काळसर व स्त्रीजातींत ज्या ठेवीची अपेक्षा पुरुष करतात, ती ठेव तिच्यांत इतकी उणी होती कीं, तिजबद्दल उगीच तसदीत पडावें हें मला बरोबर दिसलें नाहीं; पण ती तारुण्याच्या भरांत होती, म्हणून सहजच तजेलेदार दिसे. आमचा खेचरवान थोडासा अरसिक पडला, यासाठीं त्याणें तिच्या पोटांत शिरून तिची कृपा आपल्यावर होईल तर पहावें, असा निश्चय केला. ह्या लहानशा कामासाठीं कोण कोणत्या युक्ति लढवाल्या, त्यांच्या शोधाकडेच सर्व दिवस

त्याची बुद्धि व्यापिली गेली, पण त्या दिवशीं आमच्या मुकामाचें ठाणें केकाविलास हें होतें, तेथें जाऊन तेथपर्यंत, आपल्या युक्ति त्यानें प्रचारांत आणल्या नाहींत. शहराच्या शिवेंतच एका खाणावळींत आम्ही उतरलों. खाणावळीची जागा चांगली निवांत व सोईवार होती, आणि घरधनीही दुसऱ्याच्या गोष्टींत व्यर्थ मन घालणारा प्राणी नव्हता. त्यानें आम्हांला एका पृथक् व जेथें दुसऱ्या कोणाची कटकट पोंचूं नये, अशा खोलींत नेऊन बसविलें. आमच्या भोजनाची तयारी झाली. आम्ही सर्वांनीं एकाच ठिकाणीं बसून भोजन केलें. मेजावरचा कपडा नुकताच काढून नेला होता, इतक्यांत आमचा ओशेली मोठ्या आवेशानें बोंबलत आला आणि ह्मणाला:—'मेलोंरे मेलों, ठार मेलों! माझें घरदार बुडालें! हे एथें नुकतेच माझ्या पिशवींत शंभर पिस्तोल होते, ते कोणी चोरले! पण कांहीं फिकीर नाहीं, मी वस्तादगिरीनें ते परत खणून काढीन. एथें काय भूतचेष्टा लागून गेल्या आहेत! मी हाच माजिस्त्रेटाकडे चाललों. गृहस्थहो! ही सगळी थट्टा असें तुह्मी समजूं नका. आतांच्या आतां कबूल होऊन बऱ्या गोष्टीनें माझा पैसा मला माघारा द्याल, तर सुटलां, नाहीं तर तुमच्या हातापायांत शृंखळा पडाव्याच असें तुह्मी समजा.' हें सोंग त्यानें फार स्वाभाविक रीतीनें आणलें, आणि तुरतुरत फुरफुरत तो खोलीबाहेर निघून गेला. आह्मी भयानें गर्भगळित होऊन तेथेंच बसलों.

आह्मांतून कोणाएकालाही ह्या गोष्टीचें यत्किंचित्‌ही स्वप्न पडलें नव्हतें. सर्वच परस्पर अनोळखी पडलों, तेव्हां एकमेकांला एकमेकाचा संशय आला. मी तिरव्या नजरेनें त्या गवय्याकडे पाहूं लागलों, आणि कदाचित्‌ त्यानेंही माझा संशय घेतला असेल. दुसरें हें कीं, आह्मी सर्वजण केवळ पोरगे पडलो, त्यामुळें अशा प्रसंगीं कामकाजाचा परिपाठ कसा असतो. तोही आह्मांतून कोणालाच अगदीं ठाऊक नव्हता. माजिस्त्रेटा समोर आमची चौकशी गेली, तर पहिलीच मजल अंडपाशाची येईल, असें भय आह्मांला पडलें, आणि आह्मीं पपाचा फाडा मोजला; कित्येक रस्त्यावर पळून गेले व कित्येकानीं बागाचा रस्ता धरला. सारांश धैर्य धरून अरिष्टांत पडावें, त्यापेक्षां पलायन करून अरिष्ट टाळावें, ह्यांत अधिक शाहाणपण आहे, असें एकून एकाला वाटलें. हाडें चुरून घेण्याचा जसा आह्मा बाकीच्यांला तिरस्कार होता, तसा ह्या आस्लोगेकर तरुण व्यापाऱ्यालाही होता; अर्थात तोही आह्मांबरोबरच पळाला. ह्याची इतकी गाळण उडाली कीं, तो आपल्या बायकोला सुद्धां विसरला. ती बिचारी तेथल्या तेथेंच राहिली. मागाहून मला अशी कथा समजली कीं, ह्या अणिबाणीच्या वेळीं त्या खेचरवानाला आपली युक्ति साधली, असें वाटून आनंद झाला. त्याच्या खेचरास तरी कांहींसी अब्रूची भिती होती असेल, पण त्या मानवाधमाला मुळींच अब्रू नव्हती, असें म्हटलें तरी चालेल. हा एकदम त्या गृहस्थाच्या बाय·

कोकडे आपली मुलाखी चालवूं लागला; पण तिणें पतिव्रतेचा डौल आणून त्या बदसुरत संताना पासून आपला पवित्र गोरा देह संभाळण्याचा यत्न चालविला आणि मोठ्या जोरानें आरोळी मारून कळवळहो दाखविली. याच वेळीं कर्मधर्मसंयोगानें गस्तवालेहो आसपास फिरत होते, यांनीं हा गलबा ऐकून या ठिकाणीं आपल्या दस्तुरीचें काम असावें, असें मनांत आणलें. ते त्या घराकडे आले आणि दंग्याच्या कारणाबद्दल चौकशी करूं लागले; घरधनी आपल्या स्वयंपाकघरांत त्या ताणानें गात पडला होता; त्याला आपल्या गाण्यापुढें दिवाणखान्यांतील ओरड ऐकूंच आली नसावी, असें वाटतें; अथवा त्या ओरडीहून आपल्या गायनाचा सूर कितपत वर चढतो, हें पहावें, अशीही लहर त्याला लागली नसावी, असें ह्मणतां येत नाहीं. पहिल्यानें तर त्याणें आपल्या गाण्याच्या ओरडीहून दुसरी कसलीच ओरड आपल्या कानीं पडली नाहीं, असें शपथ वाहून सांगितलें, पण शेवटीं त्याला त्या गस्तवाल्या लकृनिरंजनांनीं आपणाला त्या संकटांत पडलेल्या बाईकडे नेणें भाग पाडलें. कदाचित् सर्व उपाय करून पाहिल्यावर शेवटीं आपखुषीनें त्या खेचरवानाच्या स्वाधीन व्हावें, यांतच शाहाणपणा आहे, दुसरें गत्यंतर उरलें नाहीं, अशा विचारांत ती होती, इतक्यांत ते लोक तिची सुटका करण्यासाठीं त्याठिकाणीं येऊन ठेपले असावे असें वाटतें; कारण उभयतांमधील ओरड थांबली होती, आणि हिचा

पोशाख थोडासा अस्ताव्यस्त झाला होता, त्यावरून तिला त्या कामातुर खेचरवानाचे हावभाव सहन करण्याची सवई नुकतीच पडत चालली होती, असें वाटलें. गस्तवाल्यांचा नायक तरी धसाडाच होता; त्याला त्या सुकुमार मदनाची यत्किंचितही दया आली नाहीं. त्याणें ती क्रीडा पाहतांच आपल्या भाल्याच्या दस्तानें त्या कामुक खेचरवानाच्या पुठ्यावर पांच सहा रट्टे ओढले आणि नायकोची दुर्गत घेतल्याबद्दल त्याला पुष्कळ शिव्या दिल्या. वस्तुत: पाहिलें तर त्या खेचरवानाची पापवासना ज्या मानानें ओंगळ होती, त्याच मानानें गस्तवाल्या नायकाच्या तोंडावाटे निघालेले गालिप्रदानही ओंगळच होतें. ज्या शब्दसंपुटांत त्याचा समावेश झाला, त्या शब्दांचा उच्चारही करवत नाहीं! केवळ इतकेंच करून तो उगी राहिला नाहीं; त्यानें गुन्हेगाराच्या मुसक्या बांधल्या, आणि फिर्यादी व कैदी या दोघांलाही माजिस्त्रेटासमोर आणलें. फिर्यादीच्या आंगावरील कपडे विसकटले होते, तेणेंकरून तिच्या मूळच्या सौंदर्यास अधिक कळा चढली होती; तसीच ती रंभा माजिस्त्रेटासमोर जाऊन उभी राहिली. त्या सौंदर्यकळेच्या योगानें तरी माजिस्त्रेटाचें मन पाझरून तो आपल्याला त्वरित व चांगली दाद देईल, असी उत्कंठा तिला झाली असावी तर नकळे! माजिस्त्रेटानें निदान एका पक्षकाराचें बोलणें ऐकिलें; आणि गंभीरपणें दीर्घ विचार करून गुन्ह्याचें स्वरूप फार अघोर आहे, असा निवा-

डा दिला. यानें गुन्हेगाराच्या आंगावरील कपडे उतरविले आणि आपल्या समक्ष त्याला पुरते फटके मारविले. शिक्षेचा शेवट असा झाला कीं, जर दुसऱ्या दिवशीं तिला नेण्यासाठीं त्या अस्नोर्गेकर इंद्राचे दूत न आले, तर पोलीसाच्या दोघां दुतांनीं त्या अनाथ इंद्राणीला आस्नोर्गास पोचवावें; त्याबद्दल जो खर्च येईल तो त्या खेचरहाक्या मदनाच्या पुतळ्यानें सोसावा.

आतां माझी अवस्था कशी झाली, तें सांगतों. माझ्या बरकड सोबत्यांहून मी फारच घाबरून गेलों होतों, त्यामुळे जिकडे रस्ता मिळेल तिकडे पळत सुटलों; शेतें ओलांडलीं. कुणा खंदकांवरून उडालों, वाड्या व कुरणें मागें पाडलीं, आणि शेवटीं एका जंगलाजवळ येऊन अचंब्यांत पडलों. त्या रानांतील एकाद्या निबिड झाडींत लपून राहावें असा बेत करीत होतों, इतक्यांत दोन घोडेस्वार माझ्या रस्त्यावर आडवेच आले. त्यांनीं, तूं कोण आहेस? असें मला हटकलें पण त्या हटकण्यासरशी माझी बोबडी वळून गेल्यामुळें त्यानां जबाब देण्यास माझ्या तोंडांतून शब्द निघतना. हे पाहून ते मजवर येऊन भिलगले, आणि प्रत्येकानें आपला पिस्तुल माझ्या मानेवर धरून, 'तूं कोण आहेस, कोठून आलास व ह्या जंगलांत तुझें काम कोणतें? हें खरें सांग, नाहीं तर तुला आतांच ठार करतों;' अशी धमकी दिली. आमच्या खेचरहाक्या मित्रानें आम्हांला नुसती शृंखळाबंधनाचीच भीति घातली होती, ह्या स्वारांनीं तर मला ठार मारण्याची

भीति घातली; तथापि मी आपली तथ्य हकीकत त्यानां सांगितली कीं, 'मी ओमिहाहून माच्यामां काम जाणारा तरुण प्रवासी आहे;' नंतर खेचरवा-नाच्या चोरीची गोष्ट त्यानां कळवून पुढील माराच्या भयानें माझी मोकांड झाल्यामुळे मी घाईघाईनें जीव घेऊन रस्ता सापडेल तिकडे पळालों, तो ह्या रानांत आलों, असेंही त्यांना सांगितलें. खेचरवानाची धमकी यदाकदाचित प्रत्ययास येती, तर तिचा परिणाम अडपाश व शृंखळाबंधन इतकाच झाला असता; पण नंतर तो परिणाम या स्वारांच्या दांडगट व धमकीदार प्रश्नां सरशीच मला प्राप्त झाला, आणि माझी पांचही कर्मेंद्रिये आवळून गेलीं; ज्ञानेंद्रियानीं मात्र थोडासा अव-काश खोलला, तो माझ्या जीवितास जामीन झाला. मित्र-हो, आतां दोहोंही धमकयांमध्ये तफावत किती असावी, याची तुह्मीच कल्पना करा! या स्वारांनी माझी हकीकत ऐकिली, व ती त्यांस खरीशी वाटली. मी शुद्ध भोळा-नाथ आहे, असे वाटून ते खदखदां हंसले; आणि त्यांतून एकजण ह्मणाला;—'माझ्या छोट्या मित्रा, धैर्य धर, चाल आह्मां बराबर, अगदी भिऊ नको; आह्मी तुला अशा स्थळीं नेऊन ठेवितो कीं, तेथें तुला सैता-नाचेंही वारें लागणार नाहीं.' इतकें बोलून त्यानें मला उचललें आणि आपल्या मागें बसविलें; नंतर आह्मी ह्या गिरिकंदरांत निघून गेलों.

आतां हा सर्व प्रकार काय असावा, याबद्दल मला कसलीच कल्पना होईना; तथापि मला इतकें वाटलें

कीं, पूर्वीपेक्षां कांहीं तरी अधिक बरें निपजेल. माझ्या मनांत असें आलें कीं, जर हे स्वार चोर असते तर, त्यांनीं त्याच ठिकाणीं मला लुटून फस्त केलें असतें व कदाचित ठारही मारलें असतें; तसें झालें नाहीं, त्या अर्थी ते कोणी तरी जवळपास रहाणार सद्गृहस्थ असावे; मला घाबरलेला पाहून त्यांना माझी दया आली, आणि आतां मला सुखी करण्यासाठीं ते आपल्या घरीं घेऊन जात आहेत. पण हे स्वप्नांतले मांडे फार वेळ टिकले नाहींत. निमूटपणें आडवें तिडवें वळसे घेऊन व चढणें चढून उतरून शेवटीं आम्ही एका टेकडीच्या पायथ्याशीं आलों व घोड्यांवरून उतरलों. 'हें आमचें घर;' असें त्या अज्ञातवासी गृहस्थांपैकीं एकजण बोलला. मी चौंफेर पाहिलें, परंतु घर, झोपटी किंवा माणसांना रहाण्यासारखी कसली तरी जागा, ह्यांतून कशाचाच मागमोस मला लागेना! हा काय डाव असावा नकळे, अशा अचंब्यांत मी पडलों, इतक्यांत डाहाळ्यांनीं व मातीनें आच्छादून टाकलेला एक लांकडी सांपळा माझ्या दोघांही सोबत्यांनीं वर उचलला; एका भुयारांत जाण्याचा रस्ता कोंडून टाकण्याकरितां त्यांनीं हा सांपळा केला होता. त्या भ्याड पशूंना फार दिवसांच्या सवईनें त्या टोळींतील वस्ती मनापासून आवडली होती. त्यांच्या नायकानें मला घट्ट आंवळून धरलें आणि सर्वांमागून तो सांपळा जशाचा तसा परत पाडला. याप्रमाणे तुम्हीं जसें एकाद्या उंदिराला पकडावें, तसें त्यांनीं ह्या झिलूपिरेझाच्या सुलक्षणी भाच्याला पकडलें!

## भाग ४.

### त्या भुयाराचें व त्यांतील वस्तूंचें वर्णन.

आतां मी कोणत्या लोकांत येऊन पडलों हें मला समजलें; आणि ह्या नवीन प्रकारांनीं मी भीतींतून मुक्त झालों किंवा कसें, ह्याबद्दल निर्णय कोणीही करावा. पूर्वींची भीति होती ती बरी, पण सांप्रत मी इतक्या जबरदस्त व खऱ्याखुऱ्या भीतींत पडलों कीं, माझीं सर्व गात्रें आवळून गेलीं. पैका व जीव हीं सर्व मला मुकल्यासारखीं झालीं! यज्ञस्थंडिलाजवळ जसा बळी नेत असतात, तसें त्या दोघां मनुष्यांनीं मला नेलें. मी देहभान विसरलों, आणि माझ्या सर्वांगास कंप सुटला. माझे मोहरकाटे मला वारंवार, 'भिऊं नको, भिऊं नको,' असा धीर देत, पण त्यांच्या त्या धीरानेंच माझ्या काळजांत जास्त धसका बसे. आम्ही सुमारें दोनशें कदम उतरण चालून गेलों, तेव्हां एका तबे-ल्यांत पोचलों; ह्या ठिकाणीं एका आंकड्यास टांग-लेले दोन कंदील झगझगीत पेटत होते. दाणा व वैरण ह्यांचा भरपूर सांठा मला दिसला; शिवाय सुमारें वीस घोड्यांच्या ठाणांस पुरेशी ती जागा होती. पण मी आलों, तेव्हां मजवरावर जीं दोन घोडीं होतीं, त्यांशिवाय तिसरें घोडें तेथें नव्हतें. एक म्हातारा शिद्दी त्या घोड्यांला ज्याच्या त्याच्या ठाणांवर बांधीत होता.

आम्ही तबेल्यांतून बाहेर पडलों व स्वयंपाकघराच्या रस्त्यास लागलों. वाटेवरील दिवे अंधुकच होते,

त्यामुळें कोठें झुंझुरझुंझुरसें दिसे न दिसे, तेणेंकरून माझ्या भयाचा स्वभावसिद्ध रंग अधिक चढे. स्वयंपाकघरांत आलों, तों एक जरठ बाई कांहीं मांसाचे तुकडे निखाऱ्यांवर भाजतानां व रात्रभोजनाची तयारी करतानां दृष्टीस पडली. स्वयंपाकघरांतील भांडीं कुंडीं भरपूर होतीं, व फराळाची खोलीही विपुळ भरलेली होती. ह्या पाकशाळेच्या स्वामिणीची तर तसेंचरच उतरावी! बाईची मजल साठीच्याही पलिकडे बरीच पोंचली होती! तारुण्यांत हिचे केस अग्निरंगाचे होते व त्या रंगाला ती सोनसळाच समजत होती. काळेंकरून त्या रंगाला कापडीछटा मारत चालली होती व मधून मधून मूळच्या रंगाचे झुबके दिसत, त्यांहीं करून शरत्कालाची सर्व अद्वितीय शोभा त्या बाईच्या माथीं उतरली होती! ह्या सातारखंडीची ती विक्राळ हनुवटी पुढें आली होती व लांबच्यालांब नाक खालीं घसरलें होतें; ह्या दोन्हीं वस्तूंमध्यें एक तोंड होतें, त्याची ठेवणी इतकी मागें सरली होती कीं, आपल्या अमर्याद शेजाऱ्यांला भिऊन त्यानां रस्ता देण्यासाठीं जसी काय मर्यादेनें ती अंग आवरून उभी होती असें दिसे! लाल डोळ्यांत सौंदर्य कसलें! मुंगुसाला तसले डोळे शोभतात—हिचे डोळे जांवळे होते!

ह्या अन्नपूर्णा अंधःकारदेवतेकडे माझी हाजिरी अलबत गुजरली पाहिजे; म्हणून एकानें मला हातीं धरून तिजकडे नेलें व तिला म्हणाला;—'लिओनार्दा आजीबाई, आह्मी तुह्मां करितां एक तरुण मुलगा

आणला आहे.' नंतर तसाच माझी मुद्रा अतिशय फिक्की पडलेली पाहून परत म्हणाला;—'माझ्या मुला, धैर्य धर; तुला कसलाच उपद्रव होणार नाहीं. आम्हांला एक आचारी पाहिजे, तो तूं भेटलास. तूं नसीबाचा पुतळाच आहेस ! आमच्या घरीं एक छोकरा होता, पण तो गेल्या पंध्रवड्यांत मेला; तुला त्याची जागा मिळेल. ह्या कामाला तो अमळसा अशक्तच होता : तूं चांगला दुहेरी हाडाचा दिसतोस, तेव्हां त्याहून एक दोन आठवडे अधिक टिकाव काढशील. तला खाणें, बिछाना, पैसा व मेणबत्तीचा उजेड, इतक्या गोष्टींची उणीव नाहीं; पण दिवसाचा उजेड आतां पुनः कधींच तुझ्या नजरेस पडणार नाहीं. तुझा फुरसतीचा वेळ लिओनार्दा बाई बरोबर चांगल्या मजेनें जाईल. ती बाई खरोखर चांगल्या स्वभावाची आहे. इतक्या गोष्टी तुला अनुकूळ झाल्यावर तुझीं ल्हान सान सर्व सुखें तुजबरोबरच आहेत, असें तूं समज. तूं भिकारबाजारांत जाऊन पडला नाहींस, हें तुझें सदैव होय. इतकें बोलून तो मला एका तळघरात घेऊन गेला. एथें चांगचांगल्या मद्यांनीं भरलेल्या असंख्य बाटल्या व रांजण मी पाहिले. नंतर त्यानें मला कित्येक खोल्यांतून पसार केलें. कांहीं खोल्यांत कपड्यांच्या घड्या रचून ठेविल्या होत्या; दुसऱ्या खोल्यांत लोकरी व रेशमी वस्त्रांचे ढाळ होते. ह्या खोल्यांत कित्येक फडताळांत सोन्यारुप्याचीं भांडीं होतीं, तीं त्या फडताळांच्या भिंगांतून माझ्या नजरेस पडलीं; ह्या भांड्यां-

कडे मी मेघदर्शीनें पाहिलें. नंतर मी त्याच्या मागून एका माजघरांत गेलो; हें माजघर त्या सर्व खोल्यांच्या मध्यभागीच सज्जासारखें दिसे. ह्या ठिकाणीं तीन दिवे जळत होते. एथें आल्यावर त्यानें मला पुनः माझें नांव व ओविडो शहर सोडून निघण्याचें कारण विचारलें, व मजकडून उत्तर मिळतांच मला ह्मटलें ;– ‘ जिल्ब्लास, ज्या अर्थी अन्नवस्त्राची कांहीं तरी सोई निघावी ह्मणूनच तूं आपली जन्मभूमि सोडून देशांतरास निघालास, त्या अर्थी एथें राहण्याला तूं नाखुष असूं नये. तुझे जन्मग्रह चांगले आहेत, असें त्यास समज ; नाहीं तर तूं आमच्या हस्तक झाला नसतास. मी एकच तुला सांगतो कीं, या ठिकाणीं तूं सर्व देशाच्या चर्बीवर उपजीविका चालविशील, आणि रोकड पैशांत तर तुला पाहतां पाहतां पुरेसें होईल. शिवाय ह्या स्थळीं तूं निर्धास्त राहशील. बंदोबस्ताचे सरकारी कामदार जरी शेकडोंवेळां ह्या रानांतून गेले, तरी त्यानां आमच्या ह्या भूगर्भ वास्तव्याचा थांग लागणार नाहीं. रस्ता काय तो मला किंवा माझ्या सोबत्याला ठाऊक. आसपासच्या लोकांला कळल्यावांचून हा व्यूह कसा साधला ! असें कदाचित् तूं विचारशील, तर तुला सांगतो तें ऐक :– हें घर फार प्राचीन काळीं बांधलेलें आहे; त्याचे कारागिरही दुसरेच होते. ग्रानेडा, आरेगान, व बहुधा सर्व स्पेनदेश, ह्यांवर जेव्हां मूर लोकांचें वर्चस्व झालें, तेव्हां ह्या नास्तिक लोकांच्या जुलुमांत सांपडावें, त्याहून देशत्याग करावा हें बरें, असें

वाटून ख्रिस्तिएन लोक ह्या प्रांतांत, बिस्केन व अस्तूरियांत लपून राहिले. त्यांची वस्ती डोंगरांत, किंवा रानांत असे. कित्येक लोक गुहांत अथवा ह्या आमच्या घरासारखीं घरें बांधून त्यांत राहूं लागले. कांहींकाळानंतर ईश्वरकृपेनें त्यांनीं स्पेनदेशांतून आपल्या शत्रूंस हाकून लाविलें आणि ते परत आपआपल्या शहरीं गेले. त्यावेळेपासून त्या लोकांचीं हीं एकांतस्थानें आमच्या धंद्याच्या गृहस्थांना संकेतस्थळां सारखीं झालीं आहेत. सरकारी कामदारांनीं असल्या कित्येक जागा शोधून त्यांचा नाश केला, हें खरें, पण अजूनही कांहीं जागा आहेत, आणि दैवयोगानें ही जागा मला भाड्यानें मिळाली आहे; तथापि आज पंधरावर्षांत भाड्याबद्दल एक कवडीही जो देईल तो पापी ! हा तुझा दास, कप्तान रोलिंदो ह्या टोळीचा मुख्य नायक आहे; आणि ज्या दुसऱ्या माणसाला तूं मजबरोबर पाहिलें, तो माझ्या घोडेस्वारांपैकीं एक स्वार आहे.

---

## भाग ९.

### चोरांच्या टोळीचें भुयारांत आगमन, त्यांचा वृत्तांत व खुशालीचीं भाषणें.

कप्तान रोलिंदोचें संभाषण संपतां संपतां नवे सहा असामी त्या माजघरांत आले. एक दुय्यम कप्तान व दुसरे पांचजण शिपाई. त्यांनीं, साखर, दालचिनी, मिरीं, अंजीर, बदाम व मनुका ह्यांहीं करून तोंडोतोंड भरलेल्या दोन मोठ्या टोपल्या खालीं उतरल्या.

काय मजा आचारीच असे ते मला समजले आणि माझ्या कुशलतेची फार तारीफ करूं लागले. मुख्य सरदाराने आपल्या सोबत्यांला माझ्या हकीकतीचा संक्षिप्त वृत्तांत दिला, व माझी प्रशंसा केली. इतक्या संधीस नुकतेच माझे तूळ थोडेसे उतरत चालले होते, त्यामुळें मी माझी प्रशंसा उदासीनपणे ऐकिली. मग अरण्यवासांत पडून राहिलों म्हणून म्हणा, अथवा तत्वज्ञानी पुरुषांस आत्मस्तुतीबद्दल जो स्वाभाविक तिटकारा असतो, त्यामुळें म्हणा; त्या सर्वांला मी आवडलों, असें दिसलें व आपली उर्मी काढण्यासाठी स्वर्गांतूनच माझी नेमणूक झाली, असेंही त्यांना वाटलें असावें. पूर्वीचा पोरगा मरण पावल्यापासून नामांकित लिओन्वार्दा बाईकडे ह्या भूदेवांला अमृतकुप्या अर्पण करण्याचें प्रतिष्ठित काम होतें. परंतु आतां ती पदच्युत झाली आणि तिचा तो हुद्दा मला मिळाला. ह्याप्रमाणें वृद्धा घोडीस तरुण साहीना म्हणून ज्वान शिंग्यानें तिची कंटाळ घेतली.

भजांची आवृत्ति झाल्यावर ऐवजशीर भक्कम मांसाचे गोळे पोटांत उतरले, त्याबरोबर क्षुधाशस्त्र बोथट झाले. भोजन व प्राशन हीं एकाच समयावच्छेदानें चाललीं होतीं, त्यामुळें ते खूप तारांत आले व बेधडक ओरडूं लागले. शाबास मुलांनो, शाबास! सर्वच वक्ते पण श्रोता एकही नाहीं! एकजण लांबच्या लांब गोष्ट सुरू करितो, दुसरा थट्टा झोंकतो; इकडे एक ओरडत रहातो, तिकडे दुसरा ताम सोडतो; ह्याप्रमाणें एकाचा दुसऱ्यास कांहींच मेळ पडेना. शेवटीं आप.

लाच सूर आपल्याला ऐकूं येईना, ह्मणून रोजारोजला या जुगलीचा कंटाळा आला आणि आपण वस्तादजी होऊन त्याने आपल्या शागीर्द मंडळास दुसऱ्या चांगल्या रागदारीवर आणले. तो ह्मणाला :– 'गृहस्थहो, मला कांहीं विचारावयाचें आहे. असा शुष्क गोंगाट करून एकमेकांच्या कानटाळ्या बसवाव्या, त्यापेक्षां थोड्याशा सयुक्तिक संभाषणांत वेळ घालवावा हें बरें; कां तुह्मांला कसे वाटतें ! नुकताच एक विचार मला सुचला आहे, तो ऐका व तुमच्या पसंतीस पडतो तर सांगा. दैवयोगानें आह्मी एका जुटीनें राहूं लागलों, त्यापासून आह्मांपैकीं एकानेंही परस्परांच्या वृत्तमालिकेबद्दल अथवा ज्या योगायोगानीं आपण आपला सांप्रतचा आयुष्यक्रम चालवीत आहों, त्या योगायोगांविषयीं एकदा तरी चौकशी केली आहे, असें दिसत नाहीं. यासाठीं चला आपण एकमेकांचा इतबार धरूं. ह्यांतच कांहीतरी आपल्या मनरंजना जोगें सांपडेल.' दुसऱ्या कप्तानासह सर्वांनीं ह्या सूचनेचें मोठ्या आदबीनें ग्रहण केलें ; आणि वरिष्ठ कप्तानानें पुढें लिहिल्याप्रमाणें पहिली गोष्ट सांगितली :–

'गृहस्थहो, मासिव एथील एका श्रीमान गृहस्थाचा मी पुत्र होय. माझ्या कुटुंबाच्या माणसांनीं माझा जन्मोत्साह टोलेजंग रीतीनें केला. हें केवळ कुक्कुट संतान नव्हे, तर आपला उद्धार करणारें मानवी पुत्र संतान आहे, असें समजून माझ्या पित्यानें माझ्या जन्मदिवशीं मोठी मेजवानी दिली; व आपल्या पंच

प्राणानींहि माझी जतन चालविली; माझ्या आईने तर मला स्वतः थान पाजावें. ह्यावेळीं माझ्या आईचा बापही जीवत होता. चांगला बिचारा म्हातारा, कधींच कोणाच्या कज्जा कफावर्तांत पडला नाहीं व दुसऱ्याच्या छपया पंजास गेला नाहीं; आपण भला की आपलें काम भलें. नित्य नेमाने त्रिकाळ ईश्वरस्तोत्र गाऊन व ज्या अर्थी तो लष्करी खात्यांत नोकर होता, त्या अर्थी वारंवार लढाईला जाण्याचें जे प्रसंग येत, त्याना सामोरा होऊन त्यानें कालक्रमण केलें होतें. ह्या त्रिवर्गांनींही माझी कडक उपासना चालविली, आपल्या कडेवरून त्यानीं मला कधींच खालीं ठेविलें नाहीं. शिक्षणाच्या विशेष श्रमाने माझी प्रकृति बिघडेल ह्मणून माझ्या वयाचा प्रथम चरण माझ्या मातापितरांनीं अतिशय पोरकट खेळात जाऊं दिला. मुलांची धारणाशक्ति पक्कदशेस येण्यापूर्वी त्यांच्या अंतःकरणांत शिक्षण ठेचावे, हे बराबर नाहीं, असें माझ्या बापाला वाटे. ह्या पक्कदशेची प्रतीक्षा करतां करतां हंगाम हळूच घसरून गेला. मला लिहितां वाचतां कांहींच येत नव्हतें. पण कसली फिकीर! लेखन वाचनांत नसलों, तरी दुसऱ्या प्रकारांत मी प्रवीण झालों. माझ्या बापानें मला सहस्रावधि दुसरे खेळ शिकविले. गंजिफा खेळण्यांत तर मी कोणालाच आपला हात धरूं दिला नाही; फांसांचा डाव तर केव्हांच शिकलों आणि माझा आजा आपले लष्करी मारपेच दाखवून माझें कौतुक करी, त्यापुढें तिरकमठे कसे वापरावे,

तेंही मी समजलों. आजोबानें मला थोडेसें गायनाही शिकविलें. रोजच्या रोज त्यानें तेंच तेंच गीत म्हणत असावें व मी सुमारें दहा बारा चरण त्याच्या मागून घोकीत जावें. असें करतां करतां तीन महिन्याच्या अवकाशांत मी ते चरण चुकल्या शिवाय अडखळत अडखळत म्हणावयास शिकलों. माझी तीव्र स्मरण-शक्ति पाहून माझ्या कुटुंबाच्या माणसांना अतोनात आनंद होई. माझी तर्कशक्तिही केवळ साधारण प्रतीची होती, असें ते समजत नसत. जरी माझें बोलणें वाऱ्यावर सरलें तरी ते त्याची तारीफच करीत. याप्रमाणें अनिश्चित वक्तृत्वानें त्यांनीं मला तरबेज करून सोडलें. 'अहाहा! बाळपणींच किती तरी याची बुद्धि विशाळ!' असें माझ्या बापानें आनंदाच्या भरांत वेडा होऊन वारंवार उद्गार काढावे; माझ्या आईनें माझे मुके घेऊन आपल्या आनंदास जाणवावें; आणि माझ्या वृद्ध आजोबाचे डोळे आनंदाश्रूंनीं भरून जावे. त्याच्या डोळ्यां देखत मी कशाही घाणेरड्या व ओंगळ खोडी केल्या, तरी त्यांनीं मला एक चकार शब्दही बोलूं नये. सुलक्षणी मुलाला सर्व प्रकार करण्याची मोकळीक असावयाची! देव-दूता कडून कधींच वेडें वांकडें कर्म व्हावयाचें नाहीं! याप्रमाणें माझीं बारा वर्षे शिक्षकाचें मुखावलोकन केल्याशिवाय लोटलीं. परंतु नंतर माझा पंतोजी आला; हंगाम तर केव्हांच निघून गेला होता, पण माझ्या पंतोजीनें मला गोडी गुलाबी दाखवून शिकवायाचें

मनावर घेतलें. कदाचित् मला धमकी देण्यापुरती मात्र त्याला मोकळीक होती, पण छडी मारण्याचें काम त्याच्या अधिकारा बाहेर होतें. ह्या व्यवस्थेनें माझें यत्किंचित्ही बरें झालें नाहीं; कारण कधीं कधीं माझ्या शिक्षकानें मला शिव्या हासडल्या, तरी मी निर्लज्जपणें खदखदां हंसावें, आणि कधीं कधीं रडत रडत माझ्या आईकडे किंवा आजोबाकडे जाऊन पंतोजीनें मला शिव्या दिल्या, असें गाऱ्हाणें गावें. त्या बिचाऱ्या पंतोजींचें ऐकतो कोण! त्यानें शिव्या नसल्या दिल्या तरी, दिल्या, असें मी सांगितलें ह्मणजे पंतोजी अपराधी ठरला. मग तो नाहीं नाहीं ह्मणून आकांतावर का उठेना, पुत्रप्रेमानें आंधळीं झालेल्या माझ्या मातापितरांनीं एकदम त्या बिचाऱ्याला, 'निर्दय काफर,' असी अबरू द्यावी. एका दिवशीं मी आपल्या नखांनींच आपलें अंग ओरखडलें, आणि पंतोजीनें मला मारलें असा बहाणा करून धाय मोकलून रडूं लागलों. माझी आई विजेसारखी धांवत आली आणि तिणें पंतोजीला दाराबाहेर हांकून लाविलें. मजवर एक बोट सुद्धां आपण उगारलें नाहीं, ह्मणून त्यानें नानाप्रकारें शपथा वाहिल्या, व तो दिव्य घेण्यासही कबूल झाला, पण एक वेळ झालेला ठराव कांहीं रद्द झाला नाहीं.

अशा युक्ति प्रयुक्तींनीं मी बऱ्याच पंतोजींला वाटेस लाविलें; शेवटीं एक पंतोजी मात्र मला माझ्या मना-जोगा मिळाला. छीलदार तरुण मुलाला असा पंतोजी

पाहिजे, तसा हा होता. वेश्या, मद्यपान व जुवेबाजी, ह्या तीन गोष्टी मुख्यत्वें त्याला आवडत. त्याहून दुसरा बरा पंतोजी खरोखर मला मिळाला नसता. प्रथमतः त्यानें मला मनःपूत वागूं देऊन माझ्या कुटुंबाच्या माणसांची मर्जी संपादन केली, त्यामुळें माझ्या शिक्षणाबद्दल कुलअखत्यार त्याला मिळाला. थोड्याच काळांत त्यानें मला जगाची पूर्ण माहिती करून दिली. आपल्या सर्व अड्ड्यांच्या ठिकाणीं तो मला फिरवीत असे, तणेंकरून माझें शिक्षण इतक्या पूर्ण दशेस आलें कीं, अक्षरशास्त्रा व्यतिरिक्त बाकी सर्व विषयांत मी पठाईत विद्यार्थी बनलों. आता मी आपल्या पखांनीं कोठेंही उडूं शकेन, असें जेव्हां माझ्या पंतोजीला वाटलें, तेव्हां मला आशीर्वाद देऊन तो दुसरें चेले तयार करण्यासाठीं निघून गेला.

बाळपणीं मी स्वच्छंदानें वागलों; आणि आतां मोठा झालों, तेव्हां आपल्या खऱ्या कर्तव्यकर्माच्या जबाबदारीचा विचार मला होईनासा झाला. आई बापांला तर चुटकीसरसे मुठींत धरून बसलों. त्यांची चेष्टा करणें म्हणजे कांहींच नाहीं, असें मला वाटूं लागलें. तींही माझ्या चुटकेबाजीनें फार तल्लीन होत; आणि मी जसजसी त्यांची बवेरी अधिक करीं, तसतसीं तीं मला अधिक मौजी असें मानीत. असें होतां होतां कांहीं वेळानें मला माझ्याच शीलाचे कित्येक तरुण सवगडी मिळाले, त्यांच्या सोबतीनें सर्व प्रकारच्या लफ्फांदांत मी सांपडलों. अशा बदफैली आचर

णास जो पैसा पाहिजे, तो आमच्या सग्यासोयऱ्या-कडून आम्हांला मिळेना, ह्मणून आह्मांतून प्रत्येकाने घरांतील जें कांहीं हातास सापडेल, ते लांबवण्याचा उद्योग आरंभिला, व ह्या गोष्टीनेंही खर्चाची पूर्ति होईना असें पाहून रात्रीच्या वेळीं रस्त्यांत खिसे कापण्याचा धंदा चालविला. दुर्दैवयोगानें आमची करामत पोलिसास समजली व आह्मांवर पकड-वारंट निघाले; परंतु आमच्या एका सत्स्वभावी परो-पकारी मित्राला आमची दया आली आणि आह्मीं निर्मूळ नाहींसे होऊं नये, ह्मणून त्यानें आह्मांस वक्त-शीर खबर देऊन हुशार केलें. आह्मीं आमचे पाय लांबविले व वाटमाऱ्यांच्या पदवीस चढलों. गृहस्थहो, ह्या वेळापासून आजपर्यंत परमेश्वरकृपेनें मला माझ्या धंद्यांत बरेंच यश आलें, व आतां मी त्यांत इतका घटून गेलों आहे कीं, त्याच्या भयंकर परिणामाची मला धास्तीच वाटत नाहीं.

ह्याप्रमाणें वरिष्ठ कप्तानानें आपली गोष्ट संपवितांच दुय्यम कप्तानाची पाळी आली:—'गृहस्थहो, कोणत्याही निरनिराळ्या गोष्टी परमावधीस पोंचल्या, ह्मणजे त्या सर्वांचे पर्यवसान एकाच ठिकाणीं घडतें असें ह्मणतात;—आणि ह्या प्रकारचा खरेपणा माझ्या वरिष्ठ कप्तानाची हकीकत,—जी तुह्मी नुकतीच ऐकिली आणि माझी हकीकत, ह्या दोहोंची परस्पर तुलना केली, ह्मणजे उघड दिसेल. माझा बाप तोलेदो शहरांत राहणारा एक खाटकी होता. सर्व शहरांतील

लोक यांना केवळ पशुवत् मानीत; व ते त्यांचें मानणें-
ही निराधार नव्हतें. बरें, माझ्या आईचा स्वभाव तरी
गोड असावा, तर ती आपल्या दादल्याहून सात
सवाई होती. माझ्या बाळपणांत ह्या उभयतांनींही
एकामेकांच्या ईर्षेनें मला बसतां उठतां मारीत असावें;
एखाद्या दिवशीं मला एक हजार पर्यंत देखील फटके
बसत! मोहरी एवढ्या अपराधाकरितां डोंगराएवढें
शासन होई. डोळ्यांत आंसवें आणून मला क्षमा
करा, मला क्षमा करा, अतःपर मी असें करणार
नाहीं' इत्यादि दीनवाण्या शब्दांनीं व फार काकु-
ळतीनें मी त्यांची प्रार्थना करीं, पण सर्व व्यर्थ जाई.
त्यांनीं एकदां सुद्धां मला क्षमा केली नाहीं. दहा
खेपांतून नऊ खेपा तर मला उगीच अपराधाशिवाय
मारीत. बापाच्या माराखालीं असलों, म्हणजे आपल्या
दादल्याच्या हातास जोर कमी, असें समजून माझी
आई त्याला मदत करायाला धांवे; पण बिचारी त्याच्या
हातून माझा जीव वांचवण्यासाठीं स्वप्नांत सुद्धां धजली
नसेल! त्यांच्या ह्या अनुग्रहानें मी इतका त्रासलों कीं,
माझ्या वयाचीं चौदा वर्षें पुरीं होण्या पूर्वींच मी घर
सोडून निघालों आणि भारंगानचा रस्ता धरला.
आगंतुकीनें उदरपूर्ति चालविली व शेवटीं सातागोसा
एथें आलों. ह्या ठिकाणीं मी कित्येक भटक भैरवांत
फिरलों. हे सोबती चांगल्या चैनीनें राहात असत.
भांबळ्याचें सोंग कसें घ्यावें, छंगडशाईचा बाहाणा कसा
करावा, दोनही पायांला जखमा झाल्यासारखें करून

कसें दाखवावें, व धार्मिक आणि सदय मनुष्याला कसें ठकवावें, इत्यादि गोष्टींचे शिक्षण त्यांनीं मला दिलें. प्रातःकाळ झाला कीं नाटकपात्रांप्रमाणें कोणीकोणीं कसकसल्या सोंगें घ्यावीं, त्या बद्दल निश्चय करून नाटकाची मंडणावळ पक्की करावी व रंगभूमीवर यावें; संध्याकाळ झाला, ह्मणजे पडदा पडला. मग रात्रीच्या वेळीं भोळसर लोकांस फसवून आणलेल्या साहित्यानें आमची चंगळ उडे. तथापि त्या भिकाऱ्यांच्या सोबतीनें कंटाळून शेवटीं एकाद्या संभावित मंडळांत शिरावें अशी इच्छा मला झाली, आणि एका लफंग्या चौकडींत शिरलों. एथें मी बरीच गारुडें शिकलों; पण शेवटीं न्यायरूप शरीराच्या एका अवयवाशीं आमची कटकट झाल्यामुळें सारामोसा शहरांत टिकाव काढणें आह्मांला कठीण जाऊं लागलें; नाहींपेक्षां त्याच बिचाऱ्या अवयवानें हाकांपर्यंत आह्मांला चांगला आश्रय दिला होता. आह्मांतून प्रत्येकानें आपआपला रस्ता पाहिला, व अधऱ्वाला तुरी दिल्या. माझी अवस्था काय झाली, असें विचाराल तर, राजाच्या हमरस्त्यावर सूर्योदयापासून सूर्यास्ता पर्यंत खडतर नोकरी बजावणाऱ्या एका शूर आणि वहिवाटलेल्या पलटणांत मी आपलें नांव लिहून दिलें. एथें मला इतकें सुख वाटूं लागलें कीं, मला कोणत्याच ढोंगासोंगाची गरज लागली नाहीं, यासाठीं गृहस्थहो, माझ्या सग्या सोहिऱ्यांनीं मला चांगल्या रीतीनें वागविलें नाहीं. ह्यांत त्यांचे मी फार आभार मानतों, कारण जर त्यांनीं

थोडक्याशा ममतेने मला वागविलें असतें, तर मल्हार लाटकी होऊन राहिलों असतों; व मला तुमच्या दुयम कप्तानाचा प्रतिष्ठित हुद्दा कोठून मिळाला असता !

अशी ही दुयम कप्तानाची गोष्ट संपतांच, तों व मुळचा प्रवासी ह्यांच्यामध्ये एक होतकरूसा तरुण पुढपाळ आपली पाळी केव्हां येते, तें पाहण्याकरितां आ उघडून बसला होता, त्याने आपल्या चरित्रास आरंभ केला ;-- 'गृहस्थहो, आतां ज्या दोन गोष्टी आपण ऐकिल्या त्यांहून माझी गोष्ट फार गुंतागुंतीची व चमत्कारिक आहे. सिविलीच्या शेजारीं राहाणाऱ्या एका गांवढळ बायकोनें मला जन्म दिलें. माझ्या आयुर्मानापैकीं बावीस दिवस निघून गेल्यानंतर माझ्या आईला एका श्रीमान गृहस्थाच्या मुलाचें दाईपण सांगून आलें. माझी आई अजून पूर्ववयांतच व सुंदरबांध्याची होती; तिला दूधही विपुळ होतें. त्यानचा बाळ कुलीनरक्ताचा व एकुलता एकच होता. माझ्या आईनें मनापासून त्याचे दाईपण पत्करलें आणि ती त्या बाळाला आणण्यासाठीं गेली. आईबापानींही आपलें एकुलतें एक मूल तिच्या स्वाधीन केलें. मुलाला घरीं घेऊन आल्याबरोबर त्याच्या व माझ्या अवयवरचनेंत व रूपांत तिला कांहींसे साम्य आढळलें, म्हणून कोणत्याही युक्तीनें दोघांही मुलांची अदलाबदल करावी, असा विचार तिला सुचला. त्या श्रीमान व कुलीन वंशजाच्या जागीं माझी स्थापना झाली, व मागें पुढें ह्या कामाबद्दल आपल्या ला चांगली दस्तुरी मिळेल, ह्या आशेनेंही तिच्या

विचारास मोठी वळकटी आणिली. माझा बाप नांगऱ्यांच्याच वर्गांतला, तेव्हां जी नांगऱ्यांची नीति, तीच ह्याचीही नीति असायाची. अर्थात् माझ्या आईच्या ठकविद्येस रुकार द्यायला त्याचें मन बिलकूल मागें पुढें झालें नाहीं. याप्रमाणें उभयतांच्या विचारें लागलाच निश्चय ठरल्यावर मग उशीर कसला! माझ्या ऐवजांत डॉनरुद्रिगोच्या मुलाला गुंडाळून माझ्या नावानें एका दुसऱ्या दाईकडे नेऊन ठेविलें, आणि माझी आई आपल्याच मुलाला त्या मुलाच्या नावानें थान पाजूं लागली.

उन्नत अंगस्वभाव व रक्तगुण ह्यांबद्दल लांबच्यालांब व्याख्यानें देऊन लोक जो मोठा बाऊ करून दाखवितात, तो खरा आहे, असें माझ्या गोष्टीवरून तुमच्या लक्षांत आल्यावांचून राहाणार नाहीं. माझ्या आईच्या नजरबंदी गारुडानें त्या मुलाच्या आईबापांला लागलीच मोहनी पडली. ह्या कृत्याबद्दल त्यांला काडीमात्र संशय आला नाहीं. सात वर्षेपर्यंत त्यानीं मला हातांवर नाचविलें. त्यांच्या मनांत मला चौदा विद्यांत व चौसष्ठ कलांतही निपुण करावें, असें होतें, ह्मणून त्यानीं मजकरितां सर्व प्रकारचे शिक्षक ठेविले; पण मला शिक्षकांनीं दिलेल्या पाठांची रुचि मुळींच लागत नसे; व त्यांतही विज्ञानशास्त्रावरावर कपाळकूट करण्याचा मला मनापासून तिरस्कार असे. कोणत्याही वेळीं पाहिलें तरी, माझा खेळ काय तो चाकरलोक व मोतदार ह्यांबरोबर असे. स्वयंपाकघराची तर मी मूर्तिमंत वास्तुदेवताच! खेळणें

बागडणें इतक्यांवरच माझ्या मनोविकारांची धांव थांबली नाहीं. सतरा वर्षांचा होण्यापूर्वीं मला दारुबाजीची चट लागली; व घरांतील दासीशीं मी धिंगाणा घालूं लागलों. मोदीखान्याकडील एक पोरगी माझें अत्यंत प्रीतिपात्र होतें; कारण माझ्या डोळ्यांनीं ती मला खूप सुरतपाक दिसे. ती एक फोपसी डुकरीच होती. तिची गोळसर भावना व नरम निष्ठा हीं माझ्या मनाजोगतीं पडलीं. कांहींच पगदस्ती न ठेवितां ह्या पोरीबराबर मी जेवूं खाऊं लागलों. एकादिवशीं डॉनरुद्रिगोनें मला व तिला एका ताटांत जेवतांना पाहिलें; त्यासरशे त्यानें उलटी सुलटी माझी नीट पूजा उतरली, व भिकारचिन्हाबद्दल मला पुष्कळ ठोमणे मारले. नंतर त्या पोरगीला घरांत राहूं दिलें तर, मी बिघडून जाईन असें वाटून त्यानें लागलेंच तिला घराबाहेर हाकून लाविलें.

माझ्या आराध्य देवतेला घराबाहेर काढून लाविलें, तेणेंकरून मला अतिशय त्वेष आला; व जीव गेला तरी बेहेत्तर, पण तिला कदापि सोडणार नाहीं, असा मी दृढ निश्चय केला. मी डॉनरुद्रिगोच्या बायकोचे कांहीं दागिने चोरले आणि तिच्याच धोबिणीकडून कांहीं कपडे उपटून या पोरीला घेऊन चालता झालों. डंका वाजण्याला कसलीच आडकाठी राहूं नये ह्मणून मी हें शूरत्वाचें कृत्य भर दिवसा ढवळ्या केलें. पण इतक्यांतच संपलें असें समजूं नका. मी तिला तिच्या सग्यां सोहिऱ्यांकडे नेलें व त्यांच्या संमतानें तिशीं लग्न लाविलें. डॉनरुद्रिगोची कुळक केव्हां

एकदा मोडीन असें मला झालें होतें, ह्मणून ह्या सर्व कृत्यांत कोणत्याच तऱ्हेनें लपी छपी न ठेवितां राजरोस मोठ्या आवेशानें वागलों. माझें लग्न होऊन नुकते तीन महिने झाले होते, इतक्यांत डॉनरुद्रिगोच्या मृत्यूची खबर मला पोंचली. मी एका क्षणाचाही विलंब लाविला नाहीं; डोळ्याचें पातें हालण्यापूर्वीं सिविलास आलों, आणि वारसकीचा दावा सांगून त्याच्या जिनगीची विल्हेवाट लावावी, असा इरादा धरला; पण माझ्या दैवानें उलट खाल्ली. माझी खरी आई मरण पावली आणि मरणाच्या पूर्वीं पापभीतीनें तिनें आपलें सर्व कृत्य पश्चात्तापपूर्वक कितीएक चांगल्या चांगल्या साक्षीदारां देखत एका धर्मोपदेशका समोर उघड केलें. इतकें होतांच डॉनरुद्रिगोचा मुलगा माझी,-- अथवा खरें पुसाल तर,आपली जागा बळकावून बसला. माझ्या नाचक्कीनें लोकांचें मन त्याजकडे अधिक वळले व तो लोकांला अधिक प्रिय झाला. याप्रमाणें सर्व तुताऱ्या त्याच्या हातीं गेल्यामुळें मी निराश झालो, आणि लग्नाचीच बायको काय अधिक करणार? असा निश्चय करून जो तेथून निसटलों, तो एका फाकड्या शूर व साहसी मंडळींत शिरलों व त्यांशीं भागीनें व्यापार चालविला.

ह्याप्रमाणें त्या तरुण भामट्यानें आपली गोष्ट संपवितांच चौथ्यानें आपल्या गोष्टीला आरंभ केला:--

बर्गास शहरांतील एका व्यापाऱ्याचा मी पुत्र होय. लहान असतां मला बुद्धीहून धर्म अधिक आवडे,

त्यामुळें मी सर्व एकीकडे ठेवून अगोदर धर्मावर श्रद्धा ठेविली. कांहीं वर्षें पर्यंत मोठ्या निष्ठेनें वागलों, पण शेवटीं त्या निष्ठेचा अतिशय होऊन चुकला, व दुसऱ्या कसल्याच गुणांचें बंधन कीं जेणेंकरून मला मर्यादाउलंघन करतां आलें नसतें, त्याचें वारेंही नसल्यामुळें कित्येक अवांतर प्रकारांनीं मी इतका भडकून गेलों कीं, प्रथमतः '**स्वधर्मनिष्ठ** होतों, तो शेवटीं **स्वधर्मभ्रष्ट** झालों.' सारांश आठांही चोरांनीं आपआपल्या गोष्टी एका मागून एक सांगितल्या. मी जेव्हां त्या सगळ्या गोष्टी ऐकल्या, तेव्हां खरोखर दैवाच्या गहनगतीनें ह्यांची एक जूट झाली आहे, असें मला वाटलें. हें आटोपल्यावर दुसऱ्या दिवसीं लढाईचे मोर्चे कोठकोठें कसे कसे बसवावे व कोणी कोणी कोणत्या कोणत्या दिशेनें हल्ले करावे, इत्यादि व्यूह रचनेबद्दल भवति नभवति झाली, आणि अमुक एक रचना सर्वानुमतें पसंत पडल्यावर सर्व जण उठून निजायाला गेले. मी पेटलेली मेणबत्ती हातांत धरून रोलिंदो बरोबर त्याच्या खोलींत गेलों, आणि त्याणें काढून ठेवलेले कपडे लत्ते जिकडच्या तिकडे ठेवायाला लागलों; इतक्यांत तो मला ह्मणाला:– कसें काय **जिल्ब्लास?** आह्मी कसें रहातों हें आतां तुला माहीत झालें ना? आह्मी सर्वदा आनंदांत असतों; मत्सर व अदावत ह्यांचा एथें मुळींच पायरिघाव नाहीं; आह्मी परस्पर अगदींच भेद ठेवीत नाहीं, पण समानपंथी जोग्यांसारखे एकामेकांच्या मानेवर मान घालून रहातों. माझ्या चांगल्या मुला,

तूंही या ठिकाणीं आपला काळ आनंदांत घालविशील, यांत संशय नाहीं; कारण वाटमाऱ्या गृहस्थांशीं आपल्या हाडांचा कस दाखवावा, अशी मूर्ख इच्छा तुला होईल, असें मला वाटत नाहीं. दुसऱ्या पुष्कळ संभावित धंद्यांपासून आमचा धंदा कोणत्या तरी प्रकारानें भिन्न आहे, असें तुला वाटतें काय? माझ्या मित्रा, तूं पक्कें ध्यानांत ठेव कीं, स्वतःच्या पेटींत एकच हात, पण शेजाऱ्यांच्या पेटींत दोन्ही हात शिरण्याची स्वाभाविक इच्छा सर्व मनुष्यमात्रास असते. मानवी प्राण्यांचीं मूल सूत्रें जेथून तेथून सारखींच असतात; भेद काय तो ज्या प्रकारांनीं तीं प्रचारांत आणावीं, त्या प्रकारांत असतो. उदाहरणार्थ;— सार्व भौमविजयी राजा आपल्या आसपासच्या राजांचे मुलूक बळकावतो. छानछोकी मनुष्य कर्ज काढतात पण फेड करीत नाहींत. पेढीवाले, सराफ, दलाल, कारकून आणि सर्व प्रकारचे एक ठोक किंवा किरकोळ व्यापारी आपल्या अंतरसाक्षित्वास एकीकडे ठेवून आपल्या गरजा हव्या तशा मारून नेतात. कायदेबाज गळग्रहांची तर गोष्टच सांगणें नलगे; कारण सर्व ग्रहांस ते आपल्या उदरस्थ कसें आणितात, हें आम्हां सर्वांला माहीत आहे; तथापि ते आम्हां इतके निर्दय नाहींत, ही गोष्ट कबूल केली पाहिजे; पण लुटीच्या लोभानें एकाद्या निरपराधी मनुष्याचाही प्राण घेणें हा जसा आमचा धंदा, तसाच सत्कार व इनाम यांच्या लोभानें अपराधी मनुष्यास बचावणें हा यांचा धंदा आहे.

## भाग. ६

### जिल्ब्लास पळून जाण्याचा इलाज करितो.

आपल्या आयुष्यक्रमाबद्दल असी क्षमायाचना केल्या नंतर तो चोरांचा नायक निजायाला गेला. मी आपला जेवणघरांत जाऊन आपल्या उद्योगास लागलों; मेजें साफ केलीं, खरकटीं काढलीं, व हांडीं भांडीं जिकडच्या तिकडे ठेविलीं. नंतर मी स्वयंपाकघरांत गेलों, तों दुमिंगो (एक म्हातारा शिद्दी) आणि लिओनार्दा सुग्रण माझी वाट पाहत बसलीं होतीं. आह्मीं तिघेंही जेवायाला बसलों. माझ्यानें एक ग्रास सुद्धां खाववला नाहीं. ह्या अज्ञातवासाच्या खंतीनें माझ्या मनापेक्षां माझा चेहरा अधिक उतरला होता, त्याकडे पाहून लिओनार्दा व दुमिंगो,—जोडी पण काय विचारतां! जणूं काय ब्रह्मदेवानें माझें सांत्वनच करण्यासाठीं निर्माण केली होती!— हीं उभयतांही माझ्या जिवाला धीर देऊं लागलीं. ती ह्मणाली, माझ्या लाडक्या मुला, तूं असा खिन्न कां दिसतोस? ह्मटलें तर तूं आपल्या चांगल्या नशीबाकरितां परमेश्वराचे आभार मानावे. अजून तूं कोंवळ्या बुद्धीचा लहान मुलगा आहेस; ह्या जगांत तूं दुसऱ्या कोणाच्याही खराब सोबतींत पडतास तर तुझें आचरण बिघडून जातें; आणि एथें कसें आहे? तुझ्या सदाचरणाचा भरपूर विमा उतरल्या सारखें. हें भाषण ऐकून तो म्हातारा शिद्दी मोठ्या गंभीर मुद्रेनें ह्मणाला कीं,— "लिओनार्दा बाई सांगते तें सर्व खरें

आहे. जग ह्मणजे एक तापत्रयाचें घर आहे. यासाठीं माझ्या गड्या, ह्या आपद्ग्रस्त आयुष्यांतील संकटें, धोके, व यातना ह्यांच्या दुःखांतून तूं इतक्या लौकर मुक्त झालास हे मोठें भाग्य समज."

ही चावट चरपटपंजरी मी शांतपणें सहन केली कारण राग आणून मला कांहींच फायदा झाला नसता. शेवटीं दुर्भिंगोची कोथळी तोंडांतोंड भरल्यावर मस्तकास कैफ चढल्यासारखें होऊन तो डुलक्या खात खात तबेल्यांत जाऊन पडला. लिओनार्दानें हातांत दिवा घेऊन मला एक तळघर दाखविलें. ह्या पळटणीपैकीं जो कोणी स्वाभाविक मृत्यूनें मरे, त्याला शेवटली साडेतीन हात जागा हें तळघर आपल्या पोटांत देई. येतां येतां कशावरसा अडखळल्यासारखा होऊन मी पडण्याच्या बेतांत आलों; माझ्या मतें मी एकाद्या थडग्यासच अडखळलों! पण तें थडगें नव्हतें; बिछान्याची वळकटी होती! एथें आल्यावर लिओनार्दा ह्मणाली; बाबा, ही तुझी खोली. तुझ्या कामावर पूर्वीं जो मुलगा होता, तो जीवंत असे पर्यंत येथेंच निजे, व अजूनही तो येथेंच पडला आहे. भरज्वानींत असतांच त्याला आपल्या आयुष्याचा भार सहन झाला नाहीं. त्यासारखा तूंही मूर्ख होऊं नको. ह्याप्रमाणें मला तत्वबोध करून ती, माझ्या सोबतीस दिवा ठेवून स्वयंपाकघरांत निघून गेली. मी त्या भिकार वळकटीवर जाऊन पडलों, निजण्यासाठीं नव्हे, अधिककरून मेंदू खाजवण्यासाठीं मला तसें पडावें लागलें. मी ह्मणालों:—हे

जगत्पालका परमेश्वरा,मी किती बरें दुर्दैवी! असा दुसरा कोणी तरी दुर्दैवी आहे काय? आपल्या प्रकाशानें सर्व सृष्टीला उजळ करणारा जो सूर्य, त्याचा एकही किरण यापुढें माझ्या दृष्टीस आनंदविणार नाहीं, हें निःसंशय खरेंना? अठरा वर्षांच्या वयांत असतांनाच केवळ जीवंत असून मेल्यासारखाकिर मी झालों! नाहीं, इतक्यानेंच माझ्या दुर्दैवाचा शेवट कसला होतो! रात्रंदिवस ह्या चोरट्या लुटारू लोकांची खस्त काढतां काढतां माझे पंचहीप्राण कंठीं येतील: सर्व दिवसह्या वाटमाऱ्यांच्या सोबतींत जाईल व रात्रीच्या वेळीं ह्या मसणवटींत पडून राहावें लागेल. अशा पुष्कळ विचारांनीं माझा धीर अगदीं खचून गेला आणि मला भळभळ रडें कोसळलें. मला सालामांका येथें पाठविण्यासाठीं प्रवृत्त होण्यास माझ्या मामाच्या डोक्यांत कसली कीड शिरली नकळे! केकाबिलास एथेंच राहातो, तर खेचरवाना. च्या चोरीबद्दल ज्या यातना भोगाव्या लागत्या, त्यांची कांहींना कांहीं तरी तोड जोड करायाला मिळती; तेथून पळालों खरा, पण ह्या अक्षय्य धोक्यांत येऊन पडलों. परंतु एकवेळ होऊन चुकलें तें आतां परत कसलें येतें? झाल्या गोष्टीचा पश्चात्ताप केला तर पुढें सावध होतां येईल ही गोष्ट खरी, पण एथून सुटेन तेव्हां पुढलें पाहीन कीं नाहीं! तथापि आतां "गतं न शोच्यं" दुःखसमुद्रांत मन गाढावें त्यापेक्षां एथून पळून जाण्याची कांहीं तरी युक्ति शोधण्याकडे त्याची प्रेरणा करावी हें बरें. काय! एथून पळून जावयणार

नाहीं ? ते हैवान तर सुस्त निजले आहेत ; स्वयंपाकीण व शिद्दी हीं तर केव्हांपासून घोरत पडलीं आहेत. कां! ज्या मार्गानें आपण ह्या अधोभुवनांत उतरलों, तो मार्ग ह्या दिव्याच्या योगानें मला शोधून काढतां येणार नाहीं काय ? दरवाज्याशीं जो मोठा सांपळा आहे, तो उच-लण्याजोगी शक्ति मला नाहीं हें खरें; तथापि यत्न तर करून पाहूं ! आरंभींच रडतोंडेपणा धरला तर पुढें घोड्यावर बसून तरवार मारतां येणार नाहीं. कोणत्याही गोष्टीला हिंमत पाहिजे. प्रसंग पडला ह्मण-जे युक्ति सुचते, व स्फुरणही भरतें, स्फुरणाच्या योगानें अंगांत नूतन शक्ति येते आणि सिद्धि पोंचते. त्याप्र-माणेंच मलाहि माझ्या युक्तींत जय येण्याचा संभव नाहीं असें कोणी ह्मणावें ?

ह्या दुःसाध्य कृत्यास हात घालण्यापूर्वी ह्याप्रमाणें माझ्या विचारांची सरणी लागून गेली. मी लागलाच उठलों व हातांत दिवा घेऊन त्या मसणवटींतून हळूच पाय न वाजवितां बाहेर पडलों. पाय बाहेर काढण्यापूर्वी जयप्राप्ति व्हावी ह्मणून सिद्ध लोकस्थ सर्व भूतांस गाऱ्हाणीं वाहिलीं, आणि आसपासच्या पांच कोसांवरील सर्व समंधांची मानता केली. मोठ्या प्रयासानें सर्व गिरकांड्यांतून मी पार पडलों, व शेवटीं तबेल्याच्या दरवाज्यापाशीं आलों. ह्याठिकाणीं जो मार्ग मला पाहिजे होता, तो दृष्टीस पडला. हात पाय लटलटां कांपताहेत, काळजांत धसधसी भरली आहे, व मार्ग शोधून काढला. ह्मणून धोक्याशा उमेदीनें

हर्षवायु चढला आहे, अशा स्थितींतच हिंय्या धरून पुढें गेलों. पण कटकटा! अर्ध्याच मार्गावर लोखं-डी गजांचा एक दरवाजा मला आढळला. एथें मी माझ्या जन्मस्थ ग्रहांला आणि ह्या दरवाज्याला शिव्यां-ची लाखोली वाहिली. ह्या दरवाज्याला मजबूत कुलूप केलें होतें, व त्याचे गज इतके दाट खेटून भरले होते कीं, आंत बोट सुद्धां जाऊं नये. पहिल्यानें जेव्हां मी आंत आलों, तेव्हां हा जाळीदार दरवाजा उघडा होता ह्मणून माझ्या नजरेंत आला नव्हता; ह्यावेळीं त्यानें माझी गाळण केली, त्यामुळें मी अगदीं मूर्खा-सारखा झालों, आणि अडाण्यासारखा एकदां ते गज हालवून चाचपून पाहावे, दुसऱ्यानें त्याचें कुलूप डो-कावून पाहावें, व तिसऱ्यानें कांहीं जोर केला तर वळेल किंवा नाहीं तें पाहावें, असें करूं लागलों. इतक्यांत ध्यानीं मनींही नसतानां एकाएकीं गरीब बिच्याऱ्या माझ्या खवाटांला पांच साहा सोटयांची सलामी झाली. मी असी सूरदार किंकाळी फोडली कीं, ह्या काके-शस पर्वताच्या दरीनें तिला लागलाच ताल धरिला. हा सलामी देणारा पुरुष कोण असावा, तें पाहावें ह्मणून मी मागें मान फिरविली, तों तो म्हातारा काळ-बीट शिद्दी एका हातांत एक काळा फाणस व दुस-ऱ्या हातांत एक शिक्षादंड घेऊन उभा राहिलेला माझ्या दृष्टीस पडला. तो ह्मणाला:—"हां, हां, माझ्या गड्या, भला सांपडलास! तूं पळून जाशील काय? नाहीं, नाहीं! माझ्या बुद्धीपुढें तूं आपल्या बुद्धीचा

जोर दाखविशील असें बिलकूल मनांत आणूं नको. मी तुझी सर्व चाऊल एकिली. तुला वाटलें कीं, ही जाळी उघडी सांपडेल; असेंच कीं नाहीं? माझ्या मित्रा, तूं आतां पक्कें समज कीं, आजपासून ही जाळी कधींच उघडी राहाणार नाहीं. एथून पळून जाण्याचें काम मोफतचें नव्हे! त्याला फार बुद्धि खर्चावी लागते, ती तुझ्या अंगीं कोठें आहे? आपण काय, आपली प्रज्ञा काय, ह्यांचा विचार न करितां मूर्ख बेटा आकाशास गवसणी घालायाला पाहातो.

हे चाललें आहे, इतक्यांत माझ्या किंकाळीनें दोन तीन चोर जागे झाले; आणि आपणाला पकडण्यासाठीं सरकारचे लोक आले असावे, असें वाटून त्यांनीं आपल्या दुसऱ्या सोबत्यांना उठविलें. एक क्षणही गेला नव्हता, इतक्यांत सर्वजण आपआपल्या सावधगिरीनें राहिले; तरवारी व दामे घेऊन सिद्ध झाले आणि दुर्मिगोच्या व माझ्यामध्यें तहाचीं बोलणीं चाललीं आहेत इतक्यांत, सर्व परिवाराचा परिवार आम्ही होतो तेथेंच आला. ह्यांची तरी इतकी धांदल उडाली होती कीं, मी त्यांना बहुधा नग्न स्थितींत पाहिलें असें ह्मटलें तरी चालेल. गलबा कां झाला, हें जेव्हां त्यांना समजलें, तेव्हां त्यांच्या भीतीची निवृत्ति होऊन ते पोट धरधरून हसूं लागले ह्या मंडळींत पहिल्यानें 'धर्मनिष्ठ' असून नंतर 'धर्मनष्ट' झालेला एक चोर होता, हें मी पूर्वींच सांगितलें आहे; हा चोर मला ह्मणाला;—"कां जिलब्लास, आमच्या मंडळींत

राहून तुला अजून पुरते सहा तासही झाले नाहींत, तोंच तूं आमच्या सोबतीला कंटाळलास काय? एथून निघून जाण्याचें तूं आपल्या मनांतही आणूं नये हे बरें. जा. आतां निजायाला जा. ह्या खेपेस दुर्मिगोनें दिलेल्या शिक्षेनेंच तुला सोडतों; आणि जर करतां दुसऱ्या खेपेस असेंच करतांना तूं सांपडलास, तर जो तुझ्या आंगाचा जीवंतपणींच भात उतरणार नाहीं, तो गुरूच्याच पायांला चुकेल! ह्याप्रमाणें मला ताकीद देऊन तो व दुसरे सोबती आपापल्या खोलींत निजायाला गेले. ह्यातारा शिद्दी आपल्या सावधगिरीबद्दल शाबासकी घेऊन तबेल्यांत गेला; आणि मी माझ्या मसणवटीचा रस्ता धरला. उरलेली रात्र एथें मी रडून व विलाप करून काढली.

---

## भाग ७.

### जिलूब्लास, इच्छेप्रमाणें करतां येईना ह्मणून शक्तीप्रमाणेंच करतो.

पहिले थोडे दिवस मी झुरणींत घालविले, व केवळ मृत्यूचीच मूर्ति बनलों, पण शेवटीं माझ्या प्रबुद्ध देवतेनें माझ्या कानांत असा मंत्रोपदेश केला कीं, "तूं सर्वदां ढोंग करून आनंदवृत्ति दाखीव;' त्या वेळापासून मी हाच मंत्र जपूं लागलों; मी मोठी खुषी दाखवावी, हसावें व गावें. कधीं कधीं हें करणें माझें मलाच वेडावल्यासारखेंसें वाटे, पण इलाज नव्हता. सारांश

हा मंत्र मला इतका फळास आला कीं, लिओनार्दो व दुर्मिगो हीं उभयतांही निखालस फसून गेलीं. पोपटाला आतां पिंजऱ्याची सवई पडली, असें त्यांना वाटूं लागलें. त्या चोरांलाही असेंच वाटलें. सर्व कामांत मी मोठी हुशारी व संतोष दाखवूं लागलों, व कधीं कधीं योग्य संधी पाहून मध्येंच मौजेचीं भाषणें-हीं करूं लागलों. माझ्या भाषणांत राग आणण्यासारखें कांहींच नसे व रुचेल कीं नाहीं ह्याचा पूर्वी विचार करून नंतर मी बोलें, तेव्हां माझे धनीही ऐकायाला असंतुष्ट नसत. एका संध्याकाळीं मी नकलेचीं भाषणें करीत असतां कप्तान मला ह्मणाला; 'जिल्ब्लास,—आतां तूं आपली खिन्नता सोडून दिली हें बरें केलें. तुझी दिलखुषी व मौजीपणा पाहून मला आनंद होतो. पहिल्याच ओळखीला कित्येक लोक अजाणतेपणाचें सोंग घेतात, पण जसजसी ओळख दृढ व अधिक होत जाते, तसतसे ते आपल्या गुणावर येतात; तूं असा मौजी गडी आहेस हें मला माहीत नव्हते.'

आतां माझी तारीफ ज्याच्या त्याच्या तोंडीं झाली. ते माझी इतकी गोडी बाळगूं लागले, तेव्हां आपली संधी दवडतां नये ह्मणून मी एकादिवशीं त्यांना असें ह्मटलें कीं;—गृहस्थहो, मला आपल्या मनांतील एक गोष्ट सांगण्याविषयीं परवानगी द्या. मी तुमचा पाहुणा झाल्यापासून एका नवीन प्रकाशांत पडलों. मी माझे सगळे रानटी संकल्प विकल्प आतां सोडून दिले, आणि तुमच्या ज्ञानदीपाच्या किरणानें माझा अज्ञानां-

प्रकार लयास गेला. मला आतां असें भासतें कीं, तुमचा सहचारी होण्यासाठींच ईश्वरानें मला जन्मास घातलें आहे. तुमच्यापैकींच आपणही एक व्हावें असी माझी उत्कट इच्छा आहे, मग चौघांबरोबर जें काय माझें होईल तें होवो. भर सभेंत ही सूचना निघाल्या-वर "ऐका ऐका!" असा सर्वांनीं ध्वनि काढला.—मला सभासदांत घेतलें, तर मी चांगलें नांव रूप करीन असें सर्वांला वाटलें. नंतर सर्वानुमतें असा ठराव झाला कीं, पहिल्यानें एकाद्या लहानशा खात्यांत मला अनुभवावर ठेवावें, आणि नियमित वेळांत जर मी आपल्या कामगिरींत हुशारी व अफाट छाती दाखवि-ली, तर ह्या प्रजासत्ताक राष्ट्रांत मला मोठ्या जबाब-दारीचा हुद्दा द्यावा.

यासाठीं मला माझा प्रत चेहरा दाखवीत जाणें भाग पडून गलासें भरून देण्याच्याच खात्यांत तूर्त हुशारी दाखविल्याशिवाय गत्यंतर नाहींसें झालें. ह्या खात्यांत एक एक दिवस मला एकेका युगाप्रमाणें जाऊं ला-गला, कारण मला त्यांचा पंक्तिबारदार होण्याची व त्यांच्या समागमें बाहेर जाण्यासाठीं मोकळीक मिळण्याची फारच उत्कंठा लागली होती. दुसरें एका फांसांत गळा घालण्याची हिंमत धरली तर दुसऱ्या फांसांतून तरी तो निघेल, असीही मला उमेद झाली होती; इतकेंच काय तें म्हणायासारखें माझ्या हातीं होतें. वेळ तर जातां जाईना, म्हणून कोणत्याही भुलथापीनें एकदां दांडगोला फसवन पळावें. [illegible]

चेत करून रोज या शिद्यावर नजर ठेवूं लागलों; पण ही गोष्ट अशक्य होती, कारण तो सर्वदा सावध राही. प्रत्यक्ष गंधर्वांच्या गायनवाद्यानेंही या पशूच्या चित्तास द्रव आला नसता ! आतां त्याशीं बाजवीहून जास्त शाहाणपणा दाखवावा तर, त्याला संशय जाईल ह्मणून, त्याजबराबर नेमानेंच वागणें मला भाग पडलें. तो मला जपत असे, त्याअर्थीं जसी एकादी मुरकेखोर बायको बाह्यात्कारीं पतिव्रतेचा डौल आणते, तसा मलाही आणावा लागे. यासाठीं परीक्षेची वेळा येईपर्यंत मी आपली हालचाल तबूक ठेविली आणि ज्याप्रमाणें एकाद्या सरकारीच हुद्याची वाट पाहावी, त्याप्रमाणें वाट पाहात बसलों.

असो, शेवटीं ईश्वरास माझी करुणा आली आणि माझी मनकामना पूर्ण झाली. सहा महिने संपतांच एका दिवशीं बक्षीरोलांदो आपल्या पळटणींतील लोकांस ह्मणाला:—"मित्रहो, जिलब्लासाला आतां अवरू द्यावी हें आह्मांला विहित आहे. आमच्या ह्या तरुण उमेदवाराबद्दल माझें मत वाईट नाहीं; याचा कांहींतरी गौरव करावा हें बरें. तुह्मीं जर मला विचाराल तर उद्यां त्याला आमच्या बरोबर येऊंद्या. आह्मीं त्याला अब्रूच्या रस्त्यास लावूं. आपल्या मुख्य नायकाची सूचना त्या चोरांनीं मोठ्या जयजयकाराच्या ध्वनीनें मान्य केली, आणि आपल्या कारभारांत मला घेतल्याचें पहिलेंच चिन्ह, 'आजपासून उष्टीं काढण्याच्या कामावरून तुझी नेमणूक कमी केली आहे.'

अशा हुकुमानें दाखविलें. ज्या कामावरून लिओनादा बाईस बरतर्फी मिळाली होती, तें तिचें काम तिला परत मिळालें. त्यांनीं माझा पोशाख बदलवला, आणि नुकतेंच एका गृहस्थाला लुटून त्याचे कपडे आणिले होते, ते मला चढविले. ह्याप्रमाणें कारभाराचीं वस्त्रें देण्याचा समारंभ आटोपल्यावर आपल्या पहिल्याच मोहिमेवर जाण्याची माझी सर्व तयारी झाली.

---

## भाग ८.

**जिल्ब्लास** त्या चोरांच्या टोळीबरोबर बाहेर जातो व राजरस्त्यावर बहादुरीचें काम करितो.

सप्टेंबर महिन्यांत एका रात्रीं बारा वाजून गेल्यावर ह्या भूगर्भस्थ गृहांतून पहिल्यानेंच मीं बाहेर पडलों. एक दामा, दोन पिस्तुलें, एक तलवार आणि एक बर्ची इतक्या आयुधांनीं त्यांहीं मला सज्ज केलें आणि एका कान कळाशीदार फक्कड घोड्यावर बसविलें. ज्या गृहस्थाचा पोशाख माझ्या आंगावर होता, त्या बिचाऱ्याचाच हा घोडा. मी ह्या अंधारगृहांत जमिनींतील किड्यासारखा फार काळ राहिलों होतों, त्यामुळें पहिल्यानें सूर्याचे किरण माझ्या डोळ्यांस दिपवूं लागले, पण हळूहळू त्यांची मला सवई होत चालली.

आह्मीं **पोन्तफरीदाच्या** शिमे जवळ गेलों आणि **लिआन** एथें जाणाऱ्या रस्त्यावरील एका झाडींत लपून राहाण्याचा निश्चय केला. या ठिकाणीं दडून आपल्या

तडाक्यांत एकादें सावज येतें कीं काय तें पाहत बसलों आहों, इतक्यांत कोणी एक आचार्यवर्गांपैकीं गृहस्थ आपल्या लोकांच्या रिवाजाविरुद्ध एका भिकार खेचरावर बसून येतानां आह्मीं टेहेळला. आमचा कप्तान नाक झाडल्यासारखें करून उपरोधिकपणें ह्मणाला कीं:—

वाहवा ! जिल्ह्यासाला आरंभींच चांगलें गणपतिपूजन घडत आहे. चल, जा आणि त्या गोसाव्याला ताळ्यावर आण. आह्मीं तुला साक्ष आहों, असें समज.' सर्व परीक्षकांचें असें मत पडलें कीं, ही कामगिरी केसोकेस माझ्या बुद्धीला योग्य आहे, यासाठीं होईल तेवढा यत्न करून मी ती बजावावी, ह्मणून सगळेजण मला उपदेश करूं लागले. मी ह्मटलें, 'गृहस्थ हो, तुह्मांला कुरकूर करण्याचें कांहींच कारण उरणार नाहीं. ह्या पवित्र बापाची मी लंगोटीसुद्धां उरूं देत नाहीं. ज्या स्थितीनें तो ह्या जगांत आला, त्या स्थितीत त्याला आणतों; मग तुह्मीं त्याच्या खेचराचें पुरतें स्वामित्व ग्रहण करा.' रोलांदो ह्मणालाः— नाहीं, नाहीं, खेचर कांहीं पोटास घालून बाळगण्यासारखा नाहीं; त्या खटपटींत तूं पडूंच नको; त्या सन्मान्य धर्माचार्याची थैली मिळतेशी पहा; तीच आह्मांला पाहिजे. ह्यावर लागलाच मी झाडीच्या बाहेर आलों, आणि त्या देवमाणसावर घसरलों. जातां जातां हातानें घडत असलेल्या पातकाविषयीं परमेश्वराकडे क्षमा मागूं लागलों. माझ्या सोबत्यांकडे एकवेळ पाठ झाली, ती तशीच ठेवावी असें माझ्या मनांत आलें,

परंतु त्यांतून बहुतेकांचे घोडे माझ्या घोड्याहून चलाख होते, ह्मणून मला पळतानां जर त्यानीं पाहिलें असतें, तर लागलाच माझा पाठलाग करून मला पकडलें असतें, अथवा मजवर गोळ्यांची सरबत्ती झाडली असती; या साठीं अशा धोक्यांत घालून घेणें मला आवडलें नाहीं. अर्थात् मी त्या पवित्र बापाशीं ओळख पाडून तुह्मी आपली थैली दाखवा, असें त्याला सांगितलें व पिस्तुलाची तोटी त्याजकडे धरली. तो मला न्याहाळून पाहूं लागला, आणि अधिकसा भयभीत झाल्याचें चिन्ह न दाखवितां ह्मणाला;— "माझ्या मुला, तूं फार लहान मुलगा आहेस; खराब धंद्यास कोमळ वयापासूनच उमेदवार होण्याचें हें लक्षण होय." मी उत्तर केलें कीं, ज्या अर्थीं हा खराब धंदा आहे, त्या अर्थीं ह्यापूर्वीच मी तो सुरू करतो तर बरें होतें. ह्या माझ्या बोलण्याचा खरा अर्थ त्या सुमनुष्याला समजला नाहीं. तो ह्मणाला, 'काय, बेटा तूं असें कसें ह्मणतोस ! किती तरी अंधपणा हा ! तुझी दुःखकारक स्थिति तुझ्या डोळ्यांसमोर आणायाला मला अवकाश दे ! मध्येच उतावळा होऊन मी ह्मटलें कीं, ' गुरुजी, या, या, आतां तुह्मीं आपलें पुराण एकीकडे गुंडाळून ठेवा, ह्मरस्त्यावर तुमचें कीर्तन ऐकावें हा माझा धंदा नव्हे. पैसा असला तर माझा तट्टू चालतो. तो आश्चर्यानें ह्मणतो;— 'पैसा ! आमच्यासारखे लोक प्रवासांत आपल्या बरोबर असला कचराकुचरा बाळगतात, असें जर तुला वाटत असेल, तर ह्यानिशू लोकांच्या धार्मिक-

पणाची तुला पुरती माहितीच नाहीं, असे ह्मटले पाहिजे. तुझा मिथ्याभास मला काढून टाकूं दे जेथें जेथें आह्मी जातों, तेथें तेथें आमची उस्तवारी चांगली राहते. आणि आह्मीं आमचें खाणें पिणें व रहाण्याची जागा ह्यांबद्दल ईश्वरप्रार्थनारूप द्रव्य देतों. सारांश प्रवासांत आह्मी आपल्याजवळ द्रव्य बाळगीत नसतों, पण परमेश्वरावर हुंड्या चालवितों.' मीं उत्तर केलें कीं;– 'तें सर्व खरें आहे; तथापि आपल्या हुंड्या कदाचित् अमान्य होतील, ह्या भीतीस्तव तुह्मीं तूर्तच्या गरजे पुरता पुरवठा जवळ बाळगण्यासाठीं खबरदारी घेतां. आतां व्यर्थ पाल्हाळ लावण्याची जरूरी नाहीं. मला लवकर आटोपून जाऊंद्या. माझ्या रानांतील सोबत्यांस तातड झाली आहे; यासाठीं पैसा, नाहीं तर जीव.' हे शब्द मी मोठ्या निर्धारानें उच्चारले, त्याबरोबर लक्षण कांहीं बरें दिसत नाहीं, असें त्या गोसाव्याला वाटलें. 'आतां ज्या अर्थीं जीवावरच येऊन ठेपलें, त्या अर्थीं तुझी इच्छा पूर्ण झाली पाहिजे; शब्द आणि तडाका हेंच काय तें तुमचें साहित्य-शास्त्र; असें ह्मणून त्यानें आपल्या झग्यांतून चामड्याची एक लांब पिशवी काढली व जमिनीवर फेंकून दिली. नंतर मी त्याला सखेनैव लवकर निघून जाण्यास सांगितलें. त्यानें माझ्या रामरामीचीही वाट पाहिली नाहीं, पण एकदम खेचराला टाचा दिल्या. हा खेचर माझ्या मामाच्याच खेचराचा सखा भाऊ असें मला पहिल्यानें वाटलें होतें, पण माझें अनुमान

खोटें झालें: तो चांगल्या चौकावर [redacted] गेला तो जीव घेऊन पळूं लागला, तसा मी माझ्या घोड्यावरून उतरलों. पिशवी कांहीं हलकीशी लागली नाहीं. मी पुनः माझ्या घोड्यावर स्वार झालों, आणि माघारें रानांत गेलों; याठिकाणीं माझे कुशाग्रदृष्टि सोबती मला ताजीम देण्यासाठीं टपत बसले होते. मी रिकिबींतूनही पाय बाहेर काढले नव्हते, इतक्यांत मोठ्या उत्कंठेनें सामोरे येऊन त्यानीं मशीं हातसलामी केली. गॅलांदो ह्मणाला,—"शाबास! धैर्यशाली झिलब्लासा, शाबास! तूं अद्भुत शौर्य दाखविलें. तूं काय काय करीत होतास, त्याकडे मी एकसारखा टक लावून पाहात होतों; आणि तुझी मुखचर्याही मी नीट पाहिली. कांहीं काळानें तूं चांगला हुशार व पट्टीचा वाटमाऱ्या बनशील, असें भविष्य करण्यास मला कोणतीच अडचण वाटत नाहीं. दुयम कप्तान व वरकड चोर ह्यांनींही आपल्या मुख्य कप्तानाच्या भविष्यकथनास माना डोलवल्या आणि तें तंतोतंत खरें होईल, असें ह्मणून माझी बोळवणी केली. ह्याप्रमाणें त्यांनीं माझ्या बुद्धीच्या भावी परिणामाची उत्कृष्ट कल्पना केली, ह्मणून मी त्यांचे आभार मानिले व त्यांनीं जें मर्म जाणलें, तें खरें करण्याबद्दल जेवढें माझ्या हातून होईल तेवढें करण्यास मी बिलकूल कसर करणार नाहीं, असें अभिवचन दिलें.

त्यानीं माझी जी इतकी स्तुति केली, ती माझ्या योग्यतेकडे लागत नाहीं, पण तो त्यांच्या सालसाईचा

गुण होय. नंतर मी जी लूट आणली होती, ती तपासावी, असें त्यांच्या मनांत आलें, ते ह्मणाले;—त्या गोसाव्याच्या पिशवींत काय आहे तें पाहूं. हे सुमनुष्य प्रवासांत आपले मांसाची चांगल्या प्रकारें जतन ठेवितात, यासाठीं ही पिशवी बरीच पुष्ट व टवटवीत असली पाहिजे. कप्तानानें ती पिशवी उघडली व आंतील जिनसा बाहेर काढल्या, तों दोन तीन मुठी बारीक सारीक चिल्लर तांब्याचा खुर्दा, एकादा दुसरा पितळीचा गळताईत व थोडकेसे कपड्याचे चांद इतकें सांपडलें. ही एका नवीनच प्रकारची लूट पाहून सर्व चोरांना अमर्याद हंसें कोसळलें. दुयम कप्तान ह्मणाला;—"जिल्ह्लासाचें देव बरें करो! आम्हीं त्याचे फार आभारी आहों. त्याच्या पहिल्याच मोहिमेला आमच्या भाईबंदीस शुभशकुनकारक असी ही लूट सांपडली." ह्याप्रमाणें थट्टे मागून थट्टा चालूं लागल्या. त्या काफर चोरांला हंसून बागडून मौज करण्याला हा एक विषयच सांपडला; सर्वांत एक चोर, जो देऊळ सोडून आमच्या पाताळवासी मठांत राहायाला आला होता, त्या चोरानें तर थट्टेची कमालच करून सोडली. त्यानीं ज्या सहस्रावधि चावटगिऱ्या केल्या, त्यांत त्यांच्या चप्पूपणाची पुरताई व नीतिभ्रष्टपणा हीं एकदम दिसून आलीं. त्यांनीं तर केवळ माकडांप्रमाणें दंतप्रदर्शनच आरंभिलें; एक मी काय तो वगळलेला. त्याच्या चेष्टेस मी विषय झालों, पण माझ्या चेष्टेस कोणताच विषय नव्हता, त्यामुळें माझी

गाढ्डें अगदींच शाबळलीं. तेव्हां मालीम ह्मणाला, 'जिल्ब्लासा, मी तुला मैत्रीच्या नात्यानें एक बुद्धिवाद सांगतों, त्यावर विश्वास ठेव; दुसऱ्या वेळेस तूं आपलें बुद्धिकौशल्य दाखवायाला पुढें पुढें सरूं नको. एकाला एक वस्ताद असतोच; अफाट समुद्रांत पोहून पार पडणारा मनुष्यही प्रसंगवशात् गुडघाभर पाण्यांत पोहतानांच गचकळून मरतो; सर्प दुसऱ्यांला दंश करतो पण त्यालाही चावणारें मुंगूस असतें; यास्तव आमची बरोबरी करण्यासाठीं तुला आमच्या सोबतींत कांहीं काळ घालविला पाहिजे.'

---

## भाग ९.

### एक अति बिकट प्रसंग.

दिवस बराच निघून जाई तों आह्मीं त्या रानांत रेंगळत राहिलों, पण त्या गोसाव्याची जकात भरणारा एकही वाटसरू आह्मांला सांपडला नाहीं. शेवटीं मजकडून मिळालेल्या विनोदविषयाची पुंजीच आजच्या दिवसाला बस आहे असें, समजून आह्मीं घराच्या रस्त्याकडे वळणार होतों, इतक्यांत घरघर घरघर असा चाकांचा ध्वनि आमच्या कानीं पडला, त्यावरून मोठ्या रस्त्याकडे पाहूं लागलों, तों चार खेचरांचा एक रथ जातांना आमच्या दृष्टीस पडला. खेचर भरधांव चालले होते व रथसंरक्षक तीन हत्यारबंद स्वार पिछाडीस होते. रोलांदोनें आपल्या स्वारांस थांबण्या-

ची वर्दी दिली आणि सभा भरून सर्वानुमतें शत्रूवर चाल करून जाण्याचा निश्चय ठरविला. आह्मी रणवीरांसारखे एका रांगेनें उभे राहिलों, आणि त्या काफऱ्याशीं सामना करायाला घोडे पिटाळले. रानांत असतांना जी इतकी माझी तारीफ झाली होती. तिच्या योगानें मला यत्किंचितही वीरश्री आली नाहीं, माझ्या आंगांत पाझरत्या पाझरत्या हिवाचा अनमग भरत चालला, नाड्या शिथिल होऊं लागल्या आणि दांतखिळी वाजूं लागली. हा दुःशकुन होत आहे, असें मला वाटलें. लढाईच्या आघाडीलाच मी होतों, असें ह्मटलें तरी चालेल. कप्तान व त्याचा दुयम ह्यानीं आपणा उभयतांही मध्यें मला खिळवून सोडलें होतें; बारांच्या सरबत्तीला छाती कसी द्यावी, हें म्या झटकन शिकावें, ह्मणूनच त्यांहीं मला तें हुद्याचे स्थान दिलें होतें तर नकळे. माझ्या धैर्याला ओहोट लागला आहे, असें रोलांदोला वाटून तो मजकडे तिरव्या दृष्टीनें पाहून ह्मणाला; जिलब्लासा, इकडे पहा ! खबरदार रहा ! मीं तुला एकच सांगतों कीं, जर तूं क्रियानष्टासारखा वागलास, तर गोळ्या घालून तुझा मेंदूच बाहेर काढीन. हे ह्याचे निकराचे शब्द माझ्या प्रश्नोत्तरावळीसारखे माझ्या ध्यानांत ठसले, आणि आतां हयगई करण्याची वेळ राहिली नाहीं, असें वाटून मला आपल्या भयभीत मुद्रेवर चेपण घालावें लागलें. मुकाट्यानें ईश्वरावर भरिभार ठेवून राहावें ह्याहून दुसरा कसलाच विचार राहिला नाहीं.

हे सर्व होत आहे इतक्यांत, त्या घोडेस्वारांसहित तो रथ आमच्या जवळ आला. आम्हीं कोणत्या प्रतीचे गृहस्थ आहों हे त्यांनीं जाणलें; आणि आमच्या बिरूदावरून आमच्या धंद्याची कल्पना करून ते मारागिरीच्या टप्यांत उभे ठाकले. आम्हांसारखींच त्यांकडे दामे व पिस्तले इत्यादि हत्यारें होतीं. आम्हांला झपाट्याने दाद देण्याची तयारी त्या लोकांत चालली आहे, तो एक सुंदर देखणा व भरजरी पोशाख ल्यालेला पुरुष रथांतून बाहेर पडला, आणि एका कोतवाल घोड्यावर बसून आपल्या लोकांच्या आघाडीस आला. आम्ही नऊ व ते चौघे, ( गाडीवान आपल्याच जागीं बसला होता ) असें जरी होतें, तरी ते अशा कांहीं निर्धाराने आम्हांवर चालून आले कीं, माझें भय दुणावत चालले. तथापि प्रत्येक सांध्यांतून कांपत असताही बार झाडण्याच्या तयारींत असलें पाहिजे; हें मी विसरलों नाहीं. पण खरें खुरेंच विचाराल तर, माझे डोळे मिचकावल्या सारखे होऊन माझा बार भलतीकडेच गेला; त्यामुळे परलोकीं मनुष्यहत्येच्या पातकाचा जबाब देण्याच्या दगदगींतून मी मुक्त झालों. लढाईचा इत्थंभूत इतिहास माझ्यानें तुम्हांला देववत नाहीं; कारण जरी मी रणभूमीवर हजर होतों, तरी तेथें काय काय वर्तले, तें माझ्या डोळ्यांस दिसलें नाहीं. भयानें जसा माझा गात्रभंग झाला होता, तसाच दोहीं फौजांत चाललेल्या रणकंदनावर माझ्या दृष्टीसमोर पडदा पडला होता. मला इतकेंच काय

ें आठवतें कीं, 'फत्ते ! फत्ते !' अशा शब्दांनीं माझे सोबती शंखध्वनि करीत होते; जसें काय त्यांचे फुप्फुस चामड्याचेच बनविलें होतें ! ह्या जयघोषाच्या वेगानें ज्या भीतीमुळें माझीं गात्रें आवळून गेलीं होतीं, ती भीति निघून गेली, आणि माझ्या नेत्र देवतेनें मला रणभूमीवर मरून पडलेले चार घोडेस्वार दाखविले. आमच्या बाजूकडील एकच मनुष्य मेला. हा कोण ह्मणून विचाराल तर, जो पहिल्यानें **धर्मनिष्ठ** असून नंतर **धर्मनष्ट** झाला होता, व त्या बिचाऱ्या गोसाव्याच्या पवित्र ताइतांची व चांदांची कुचाळी करीत होता, तो **'कुऱ्हाडीचा दांडा'** ! ह्यानें आपल्या टवाळ्यांचा दंड ह्या ठिकाणीं भरला ! दुय्यम कप्तानाच्या हातास थोडीसी जखम झाली; पण गोळी नुसत्या चामडीलाच चाटून निसटली.

**रोलांदो** सगळ्यांच्या पूर्वीं रथाच्या दाराशीं आला. आंत सुमारें चोवीस पंचवीस वर्षांच्या वयाची एक बायको बसली होती. ती जरी अशा विपन्नांत होती, तरी **रोलांदोला** ती देवरंभेसारखी दिसूं लागली. लढाईच्या वेळीं तिला जी मूर्छा आली होती, ती अजूनही तसीच होती. **रोलांदो** तिचें सौंदर्य पहात लुब्धमुद्रेनें तटस्थ उभा असतां, आह्मी लढाईत काबीज केलेल्या लुटीची विल्हेवाट करण्याकडे गर्क झालों होतों. आमच्या गोळीबारांच्या आवाजास बुजून शत्रूंचे घोडे जिकडे तिकडे पळाले होते, त्यांना शोधून आणण्याच्या

आपला जीव बचावण्यासाठीं पळाला होता, तरी रथाच्या खेचरांनीं आपला एक केसही हालवला नाहीं. आह्मीं घोड्यांवरून खालीं उतरलों, आणि त्या खेचरांवरील सरंजाम उतरून गाडीच्या आघाडीपिछाडीस कांहीं संदुका बांधल्या होत्या, त्या सोडून त्यांवर लादल्या. ही व्यवस्था झाल्यावर कप्तानानें त्या तसल्याच मूर्छित बायकोला एका उत्तम घोडेस्वाराच्या समोर टाकलें व आह्मीं ते घोडे व खेचर घेऊन कूच केला. तीं प्रेतें तसींच रस्त्याच्या बाजूंवर पडलीं होतीं.

---

## भाग १०

त्या बायकोशीं त्या चोरांची वागणूक.
जिल्ब्लासानें एक मोठी मसलत
योजिली, तिजबद्दल वृत्तांत.

सुमारें रात्रीच्या आठांचा अमल झाला होता, तेव्हां आम्हीं आमच्या भूगर्भस्थ हवेलींत येऊन पोंचलों. प्रथमतः तबेल्यांत जाऊन आमच्या घोड्यांला पागेस लावलें. आमच्या आम्हांलाच मोतद्दार व्हावें लागलें, कारण तो म्हातारा शिद्दी तीन दिवसांपासून आजारी पडला होता. रक्तदोष व संधिगत वायु यांहींकरून तो अगदींच परस्वाधीन झाला होता; एक जीभ काय ती त्याच्या स्वाधीन होती, ती उपयोगांत आणून तो सहस्रावधी आणा शपथा व शाप वाहात पडला होता. त्याला तसाच बरळत सोडून आम्ही त्या बायकोची

बरदास्त राखण्यासाठीं स्वयंपाकघरांत गेलों. आमच्या बरदास्तीला इतकें कांहीं यश आलें कीं, थोडक्याच वेळानें ती आपल्या मूर्च्छेपासून सावध झाली. परंतु देहभानावर येतांच आपण केवळ पराव्यांच्या गोटांत सांपडलें गेलें, असें जेव्हां तिनें पाहिलें, तेव्हां आपल्या दुर्गतीची कल्पना करून ती अगदीं भिऊन गेली. दुःख व निराशा यांहींकरून अत्यंत विव्हळ होत्साती तिनें जसें काय, 'हे दीनदयाळा परमेश्वरा, आतां माझे जे छळ होतील, त्यांतून मला पार पाड,' असें ह्मणून आपले डोळे आकाशाकडे लावले. नंतर एकदम तिच्या अंतःकरणांत ह्या अति भयंकर विचारांचा पूर्ण सांठा होऊन ती परत मूर्च्छित झाली आणि तिचे डोळे झांकले. त्या चोरांना आपला भक्ष्य यमराजा हिसकावून घेतो असें वाटूं लागलें. यासाठीं आपल्या शुश्रूषोपचारांनीं तिला पीडा देण्यापेक्षां निवांत पडलेली राहूं द्यावी हें बरें, व असें केलें तर कदाचित् आपला भक्ष्य राहिला तर राहील असें वाटून कप्तानानें तिला लिओनार्दच्या बिछान्यावर निजवली, आणि सहजगत्या जें होईल तें होऊं दिलें.

नंतर आह्मीं माजघरांत गेलों. एथें जो एक चोर वैद्यकीही शिकला होता, त्यानें दुयम कप्तानाच्या हातास लागलेली जखम पाहून सवरून तिजवर मलमपट्टी बसविली. हें वैद्यकीचें काम आटोपल्यावर मुस्तायकी तपासण्यास सुरुवात झाली. कित्येक संदुकांत कलाबतूचे व सणाचे कपडे होते, कित्येकांत नाना-

प्रकारचे पोशाखी कपडे, आणि एकींत नाण्याच्या कांहीं थैल्या होत्या. ही पेटी त्यांना कामधेनूसारखी वाटली. हा सूड झाल्यावर स्वयंपाकिणीनें मेजें मांडून जेवणाची सर्व तयारी केली. प्रथमत: आह्मीं जो जय मिळविला त्याबद्दल भाषणें झालीं. ह्या विषयावर **रोलांदो** मला अनुलक्षून ह्मणाला;—'**जिल्ब्लास** खरें सांग, तूं अतिशय घाबरून गेला होतास नाहीं काय?' मी कपट सोडून खऱ्या गोष्टीला कबूल झालें; पण एक दोन खेपा आव्यांतून उतरल्यावर सिंहाच्या छातीनें युद्ध करीन असें त्याला वचन दिलें. दुसऱ्या सोबत्यांनीहि माझा पक्ष घेतला. ते ह्मणाले कीं;—"आजची लढाईच मोठ्या निकराची झाली, तेव्हा दारूचा धूरही ज्याच्या नाकांत गेला नव्हता, अशा **जिल्ब्लासाला** पहिल्यानेंच भय वाटलें, यांत कोणतेंच नवल नाहीं."

नंतर आमच्या पागेस जे नवे खेचर व घोडे जोडले गेले, त्यांजबद्दल आह्मीं गोष्टी केल्या. दुसऱ्या दिवसीं सकाळीं सूर्योदयाच्या पूर्वीं उठून आमच्या छाप्याची वार्ता जोंपर्यंत पसरली नाहीं, तोंपर्यंत त्यांना **मान्सिला** एथें नेऊन विकावें असा ठराव झाला, आणि आमचें जेवण आटोपलें. मग आह्मीं त्या बाय-कोची विचारपूस करण्यासाठीं स्वयंपाकघरांत गेलों. ती तसीच मूर्छित पडली होती. तिची हालचाल बंद झाल्यासारखी होऊन थोडकीसी धुगधुगी मात्र होती, तथापि ह्या शिकार चोरांतून कित्येकजण वांकड्या

डोळ्यानें तिजकडे पाहूं लागले; इतकेंच नव्हे, पण दुष्ट वासनांचे तरंगही त्यांच्या अंगीं स्पष्ट दिसूं लागले. आपल्या वासना तृप्त करायाला ते उघडपणें प्रवृत्त झाले असते, पण रोलांदोनें त्यांच्या चाकांत आर सारली. निदान त्या बायकोची भीति व मळमळ निघून जाऊन मजेदारीपैकीं आपला वाटा घेण्यास ती योग्य होई, तोंपर्यंत तरी सर्वांनीं थांबावें, असें रोलांदोनें सांगितलें. मुख्य कप्तानाच्या हुकुमाबाहेर चालतां येईना ह्मणून त्यांना इंद्रियनिग्रह करणें भाग पडलें; नाहीं पेक्षां मृत्यूनेंही त्या बिचाऱ्या बायकोला ह्या काळांच्या जुलुमापासून सोडवलें नसतें.

यासाठीं परत आली त्या तहभागी बायकोला तसीच झुरत टाकून आपआपल्या जागीं निजायाला गेलों. रोलांदोनें लिओनार्देला तिची देखरेख ठेवायाला सांगितलें. मी निजायाला ह्मणून गेलों खरा, पण झोंपेच्या आर्जवास अधिकसें न गुंततां त्या बायकोच्या दुर्दैवावर विचार करूं लागलों. तिचा कुलीनपणा व सद्गुण ह्यांबद्दल मला संशय राहिला नव्हता, ह्मणून तिची केविलवाणी स्थिति पाहून मला अधिकच दया आली. पुढें अमुक अमुक प्रकारें तिचे भयंकर छळ होतील, ते माझ्या मनांत मूर्तिमंत येऊन माझ्या आंगावर शहारे उभारले आणि मला मनापासून असी काय तिची काकळूत वाटूं लागली कीं, जणू ती व मी अत्यंत स्नेहसंबंधानें अथवा एका रक्ताच्या धाग्यानेंच बांधलें आहों. याप्रमाणें तिच्या गहन दैवगतीविषयीं

कांहीं वेळ शोक करून शेवटीं मी तिच्या पातिव्रत्याचें संरक्षण कसें होईल व ह्या कारागृहांतून माझीही सुटका कशी होईल, ह्याबद्दल विचार करूं लागलों. तो म्हातारा शिद्दी तर सर्वांगत वायूनें खिळून पडला होता, तेव्हां त्याच्यानें कांहीं हालचाल करवणार नाहींच असें मला वाटलें; व लोखंडी जाळीच्या दरवाज्याची चावी स्वयंपाकिणीकडे आहे, हेंही मला आठवलें. ह्या विचारानें माझी कल्पनाशक्ति उज्वलित झाली, आणि मला एक युक्ति सुचली. ही युक्ति मी कोणकोणत्या मजलांनीं सिद्धीस नेली ते सांगतों.

मी पोटशूळ चाळवल्याचें सोंग घेतलें—शूळग्रस्त मुलगा कसा हायाहुया घालतो व परवतो हे मला माहीत होतें; पण ह्याच्याही पलीकडे मी मजल खेटली आणि इतक्या पोट तिडकीनें ओरडलों कीं, माझे सभ्य मित्र लागलेच जागे होऊन गोंगाट कसला झाला, तो पाहायाला मजजवळ आले. माझ्या पोटांत मुरडा उठला आहे, असें मी यांना कळविलें, आणि खरें करून दाखविण्यासाठीं दांत करकरावूं लागलों, वेडे वांकडे चेहरे करूं लागलों आणि सर्व प्रकारें व्यथेनें वेडा होऊन मरतों कीं वांचतों असें करून दाखविलें. नंतर तिडीक थोडीसी थारली, असें दाखवून एकदम शांत झालों; क्षणभरानें बिछान्यावर गडबडां लोळून एकदम हातपाय ताठल्यासारखे केले. सारांश मी माझ्या सोंगाची इतकी हुबेहुब बतावणी केली कीं, हे चोर जरी पूर्वीं अशा कसबांत निपुण होऊन ह्या धंद्यास

लागले होते, तरी त्यांची मति एकदम गुंग होऊन माझा रोग खरा आहे, असें त्यांना वाटलें. ते सर्व एकदम माझ्या उपचारांस लागले. एकानें मला ब्रांडी-चा घोटा पाजला, दुसऱ्यानें मी नको नको ह्मणत असतांनाही बळेंच गोड्या बदामाचें तेल मला रगडून चोळलें, तिसऱ्यानें एक फ्लानेलचा रुमाल आगीसारखा तापवून माझा कोठा शेकला. हे उपचार मला सहन होईनात ह्मणून मी पुष्कळ ओरडलों, पण ऐकतो कोण? पोटशूळाच्या व्यथेनें मी ओरडत आहे असें समजून माझ्या कृत्रिमरोगाच्या निवारणार्थ जे उपाय ह्मणून ते करूं लागले, तेच मला खऱ्या खुऱ्या नवीन रोगा सारखे झाले. शेवटीं हा दवा जेव्हां अगदींच सहन होईनासा झाला, तेव्हां मला आतां बरें वाटतें असें शपथ वाहून त्यांला सांगितलें, आणि कृपा करून मला आतां निजूं द्या, असी त्यांची विनंती केली. त्यानींही मला आपल्या ममताळूपणाच्या उपचारांनीं ठार मारण्याची तकुवी केली, व त्या उपचारांची पीडा परत होऊंनये ह्मणून मीही पुनः पिरपिरलों नाहीं.

हा क्रम एकसारखा तीन तास चालला होता. नंतर दिवसाचा गोंडा फुटण्याची वेळा आली, असें समजून त्या चोरांनीं **मान्सिलास** जाण्याची तयारी केली. मीही त्यांच्या बरोबर जाण्यासाठीं उठण्याचें सोंग केलें, पण ते मला उठूं देईनात. **रावरोलांदो** ह्मणाले;—नको, **जिल्ब्लास** नको, माझ्या मुला, तूं एथेंच रहा; कदाचित् तुझा पोटशूळ परत चाळेवल.

दुसऱ्या वेळेस तुला आम्हीं बरोबर नेऊं; आज तुला चालण्याची शक्ति नाहीं. कदाचित् अधिकसा आग्रह केला तर न जाणो ते मला बरोबर घेण्याला चुकणार नाहींत, असें वाटून मीही तो विषय पुढें चालविला नाहीं; पण आशाभंग झाल्याचें मिष करून दाखविण्यास चुकलों नाहीं. ते सर्व माझ्या मसलतीचा यत्किंचित्‌ही संशय न घेतां निघून गेले. ज्या प्राप्तीसाठीं माझी इतकी खडतर तपश्चर्या चालली होती, तिचा प्रथम चरण ह्याप्रमाणें साध्य झाल्यावर मी मनांत म्हटलें;—"जिलब्लास! दृढ निश्चय धरून काम तडीस नेण्याची तुला हीच संधी आहे! कामाला मुहूर्त तर नामी पडला आहे, ह्यासाठीं धैर्यरूप शस्त्रानें सज्ज हो. दुमिंगो तर हात पाय खिळून पडला आहे; लिओनार्दा दांत दाखवील पण तिच्यानें चाववणार नाहीं. सुपर्व आलें आहे, तसें एकदम साधून घे; नाहीं तर दुसऱ्या अशा पर्वासाठीं तुला कितीएक दिवस लोटावे लागतील नकळे." अशा आत्मगत भाषणानें मी आपल्याला धैर्य व ईर्षा आणिली. लागलाच बिछान्यावरून उठलों, आणि तरवार व पिस्तुलें घेऊन स्वयंपाकघरांत गेलों; पण तेथें जाऊन पोचण्यापूर्वी लिओनार्दा त्या कुलस्त्रियेशीं काय भाषण करीत होती, तें कानोसा घेऊन ऐकूं लागलों. ती कवटाळीण म्हातारी त्या साध्वीची असी दशा पाहून तिला मोठमोठ्या अध्यात्माच्या गोष्टी सांगत होती:—"मुली, रडून सवरून तूं आपलें दुःख घालवीत आहेस हें नीटच आहे. एका-

एकीं ध्यानीं मनींही नसतां तुजवर घाला पडल्यासारखा झाला, तेणेकरून तुझी मुरकुंडी झाली, ह्यांत नवल नाहीं; परंतु अरिष्टाची वेळा गेली, आतां यंत्रे सुरळीत चालण्यास कसलीच अडचण नाहीं. तुझें दुःख हळू हळू कमी होत जाईल, आणि आमच्या ह्या सभ्य पुरुषांबराबर रहाण्याची तुला सवईही लागत जाईल. तुला माहित आहे? हे फारच चांगले गृहस्थ आहेत. एथें तूं एकाद्या राजकन्येहूनही अधिक सुखानें नांदशील. ते तुझी चाहा कशी ठेवतील हें तुला कळत नाहीं. त्यांच्या पैकीं कोणा एकाच्याही उपकारांत पडल्याशिवाय तुझा एकही दिवस लोटणार नाहीं. हें तुझें दैव आपल्याला मिळावें ह्मणून दुसऱ्या शेकडों बायका देवाकडे नवस करतील.'' ही हलकट बकवा ह्या उपर मी तिला करूं दिली नाहीं. एकदम आंत शिरून तिच्या छातीवर पिस्तुल धरला, आणि आविष्ट मुद्रेनें, 'लोखंडी जाळीच्या दरवाजाची किल्ली दे, नाहीं तर एथेंच ठार करतों,' असा दट्टा दिला. दांत पडले, केस पिकले, डोळ्यांनीं दिसेनासें झालें, पोंक आलें, हात पाय लडलडूं लागले, चामड्या सुरकुतून लोंबूं लागल्या व सर्व इंद्रियें परस्वाधीन झालीं, अशा प्रकारें वृद्ध झालेल्या मनुष्यासही, सर्व वस्तूंत अत्यंत प्रिय जो जीव, त्याचा कंटाळा येत नाहीं. जरी **लिओनार्दा** कांहींशी अशाच स्थितींत होती, तरी जिवापुढें तिला चावीची आस्था झाली नाहीं. हातांत चावी मिळतांच मी माझ्या दयेस

पात्र झालेल्या त्या दुःखग्रस्त स्त्रियेला ह्मणालों;--बाई, ईश्वरानें तुझें तारण करण्यासाठीं मला पाठविलें आहे; उठ आणि मजबरोबर चल; तुला ज्या ठिकाणीं गेलें पाहिजे त्या ठिकाणीं मी नेतों. त्या बायकोनें ही माझी सूचना मान्य केली; ह्या सूचनेचा ठसा तिच्या कृतज्ञ मनावर इतका उठला कीं, ती झट्कन उठली, माझ्या पायीं पडली आणि कसेंही करून आपली अब्रू राखा ह्मणून मला शपथा घालू लागली. मी तिला वर उठविलें आणि कांहीं चिंता नाहीं, माझ्या भरवशावर स्वस्थ रहा असें अश्वासन दिलें. दैवयोगानें त्या स्वयपाकघरांतच पडलेल्या कांहीं दोऱ्या मला सांपडल्या, त्यांहींकरून मी त्या बाईच्या सहायानें लिओनार्देला, 'हूं कीं चूं करशील तर खबरदार, नाहीं तर ठार मारीन' अशी धमकी देऊन एका मोठयाशा मेजाच्या खुरास बांधून टाकिलें. हें झाल्यावर मी एक मेणबत्ती शिलगावून त्या बाईसमवेत खजिन्याच्या कोठडींत गेलों, आणि कांहीं एकेरी व कांहीं दब्बू असे जितके माझ्या गजव्यांत भरतील तितके पिस्तोल घेतले. त्या बाईलाही मी सांगितलें कीं, तूं केवळ आपल्या घरीं आहेस असें समज, आणि कांहीं एक आशंका न धरितां तुझें जें द्रव्य ह्या चोरानीं आणलें आहे, त्यांतून सोईस पडेल तितकें घे. ह्याप्रमाणें आपली खर्ची सावरून आम्हीं तबेल्याकडे गेलों; आंत शिरतानां मी माझ्या पिस्तुलांचे घोडे चढविले; कारण कदाचित् त्या काळतोंडया ह्यातान्या शिद्यानें आपल्या

संधिवायूस एकीकडे ठेवून तुसडेपणानें मला स्वस्तपणें घोडयास जीन लगाम करूं दिलें नाहीं, तर एकाच तडाक्यासरसें त्याला सर्व वेदनांतून मुक्त करावे, असा माझा निश्चय होता. पण देवदयेनें तसा प्रसंग आला नाहीं: ह्या क्षणींच तो इतका व्यथित झाला होता कीं, तबेल्याचें दार उघडून मी केव्हां घोडा चोरला हें त्याला बिलकूल समजलें नाहीं. ती बायको दारावर माझी वाट पाहात होती. आम्हीं थोडक्याच वेळांत मार्ग हुडकून काढला, लोखंडी जाळीच्या दरवाज्याशीं पोंचलों, चावी लावून तो दरवाजा उघडला आणि शेवटीं सांपळ्याजवळ आलों. आतां हा सांपळा कसा उचलला जातो, अशा विचारांत आम्हीं पडलों, पण पुढील सुटकेच्या आस्थेनें आमच्या अंगांत दुप्पट शक्तीचें स्फुरण चढलें होतें, त्यामुळें आम्हीं तो सांपळाही उलथून टाकला.

त्या विवरांतून आह्मीं बाहेर पडलों, तेव्हां नुकत्याच दिशा उजळत चालल्या होत्या. पहिल्यानें त्या जाग्यापासून जितकें दूर जाववेल तितकें जावें, असा आह्मीं बेत केला. मी उडी मारून जिनावर बसलों व त्या बाईला मागें घेतलें. जो दृष्टीसमोर पहिला रस्ता सांपडला, त्या रस्त्यानें घोडा दुमटून रानाच्या पार झालों. नंतर रस्त्याला फांटे फुटलेले आह्मांस आढळले. जें होईल तें होवो, असें ह्मणून आह्मीं एक फांटा धरला; मनांत कदाचित् हा रस्ता माद्रिदकडे गेला तर रस्त्यावर रोलांदो व त्याचे सोबती

ह्यांची गांठ पडेल हें भय होतेंच. नसीबानें हा रस्ता तो नव्हता. सुमारें तीन प्रहरांनीं आह्मीं आस्तोर्गा येथें पोंचलों. एकाच घोड्यावर पुढें पुरुष व त्याच्या मागें बायको बसली आहे, असा देखावा पाहून लोक आश्चर्य करूं लागले. पहिल्यानेंच जो भटारखाना लागला, त्यांत आह्मीं उतरलों. न्याहारीसाठीं ससाचें व कवड्याचें मांस तयार करण्याची मी लागलींच वर्दी दिली. तयारी चालली असतां आह्मीं एका खो- लींत जाऊन बसलों आणि परस्पर ओळख देख जमवूं लागलों. रस्त्यावरून भारी तांतडीनें यावें लाग- ल्यामुळें हा योग पूर्वीं जमून आला नव्हता. तिनें माझ्या उपकाराविषयीं भारी कृतज्ञता दाखविली, व ज्याअर्थीं अशा भलाईचें कृत्य मीं केलें, त्याअर्थीं त्या चोरांच्या जमातींतील मी नव्हें, असें आपण समजतें, ह्मणून मला सांगितलें. मीही ह्या तिच्या अनुमानाचें दृढीकरण करण्यासाठीं तिला माझी सर्व हकीकत सांगितली. ह्या उपायांनीं तिचा माझ्यावर चांगला विश्वास बसला व पुढील भागांत सांगितल्याप्रमाणें तिनें आपल्या दुर्दैवाचें चरित्र मला कथन केलें.



## भाग ११

### दोनामेनूशाची हकीकत.

मी वालांदोलिद एथें जन्मलें, आणि मला दोनामेनूशा असें ह्मणतात. माझ्या बापाचें नांव दान-

**मार्तिन.** ह्यानें आपल्या वंशपरंपरागत वतनाचा बराच भाग शिपाईगिरींत खर्च केला, आणि तो **पोर्तुगालांत** आपल्या पलटणीवर मुख्य असतां लढाईंत मरून गेला. मी त्याला एकुलती एकच कन्या होतें, पण त्याच्या मागून मला इतका थोडा ऐवज राहिला कीं, कोणत्याही श्रीमान व योग्य वराची बरोबरी करण्यास माझी लायकी नव्हती. अशा साधारण स्थितींतही मजशीं प्रीतीनें लग्न करूं इच्छिणारे पुरुष होतेच. **स्पेन** देशांतील कित्येक चांगचांगल्या शिलेदारांचा डोळा मजकडे लागला होता. त्या सर्वांत माझी प्रीति **दानभ-ल्वार** ह्याजवर विशेष होती. आपल्या प्रतिस्पर्ध्यांहून हा चांगला देखणा होता हें खरें; पण ह्या देखणेऊपणालाच मी भुललें असें नाहीं; दुसऱ्यांहून ह्याची गुणसंपन्नताही बरी होती. हा मौजी, शाहाणा, शूर, इमानी, गुणग्राही आणि दबदार होता. तुह्मीं कोणत्याही समारंभांत त्याला बोलावा, त्याचा गुणग्राहीपणा निदर्शनास आल्यावांचून नाहींच राहायाचा. कसरतीच्या आखाड्यांत गेला, तर सर्वांचे डोळे एकसारखे त्याच्या बळाकडे व हातचलाखीकडे लागत. सर्वांतून मी ह्याला वेंचून काढलें व त्याशीं लग्न लाविलें.

आमच्या लग्नानंतर थोड्या दिवसांनीं एका आडजागीं माझ्या नवऱ्याची व **दानआंद्र्** याची गांठ पडली. माझ्या नवऱ्याच्या प्रतियोग्यांपैकीं हा एक होता. त्या दोघांनींही परस्परांवर तरवारीनीं हल्ले केले, त्यांत **दानआंद्र्** पडला. **बालादोलिदाच्या** फौजदाराचा हा

पुतण्या होता; तो फौजदार जातीनेंही धांदली व त्रासक असून माझ्या नवऱ्याच्या घराण्याकडे मोठें हाडवैर ठेवीत असे. हें पाहून **दानअल्वार** आपल्याला आतां कोठें पळून जातां येईल अशा विचारांत पडला. तो मोठ्या त्वरेनें घरीं परतला, आणि चाकराला घोडा तयार करायाला सांगून झालेली सर्व हकीकत मला कळविली. तो ह्मणाला:—'माझे प्राणप्रिये **मेन्शा,** शेवटीं आमचा परस्पर वियोग घडल्यावांचून रहात नाहीं. तो फौजदार कोणत्या प्रकारचा मनुष्य आहे, हे तूं चांगलें जाणतीस; सांप्रत आमचें दुर्दैवच ओढवल्यासारखें झालें आहे; तो मला शोधून काढून ठार मारल्याशिवाय रहाणार नाहीं. त्याची चलती तरी कशी आहे, हें तूं जाणतीस? त्या एकट्यासाठीं सर्व राज्याचा क्रोधाग्नि खवळून जाईल: मला कोठेंच रहायाला थारा होणार नाहीं. तो आपल्या व माझ्याही दुःखानें इतका वेधून गेला आहे कीं, सहज्याच्या रीतीनें तो माझ्या एका केसाचीही सबुरी करणार नाहीं.' मी त्याला कांहीं द्रव्य व थोडेसे डागिने दिले, ते घेऊन त्यानें माझ्या गळ्यास मिठी मारली, आणि आह्मीं उभयतांही सुमारें पाव तासपर्यंत स्फुंदून स्फुंदून रडलों थोडक्याच वेळानें घोडा तयार होऊन दाराशीं आला त्यानें मजपासून आपला देह फाडून घेतला आणि घोड्यावर बसून मार्गस्थ झाला. त्याच्या वियोगानें मला जें दुःख झालें, तें उघड करून सांगण्यास मला शब्द सुचत नाहींत. वियोगदुःखाच्या अतिशयानें

असी इच्छा झाली. आपली इच्छा तृप्त करण्यासाठीं त्यानें माझ्या नातलगबायकांतून एकीला मध्यस्थींत घालून तिजकडून मला कांहीं प्रयोजना निमित्त आमंत्रण देवविलें. हे वृद्ध कपिही त्या ठिकाणीं समारंभाला होते. पतिवियोगजनित दुःखाच्या खुणा माझ्या तोंडावर साफ दिसत, त्या पाहून सकृद्दर्शनींच त्याला फार कळवळा आला. माझी खिन्न व झुरती मुद्रा त्याच्या अंतःकरणांत बिंबली आणि माझ्या निष्ठेबद्दल त्याला चांगली कल्पना झाली. नंतर त्याच्या मनांत ज्या इच्छा उद्भवल्या, त्यांला त्याचा सभ्यपणा किंवा रतिउल्हास कारण झाला, याची कल्पना मला होत नाहीं. त्यानें वारंवार माझ्या अद्भुत निष्ठेची तारीफ करावी; आणि माझ्या मृत पतीचें दैव दुसऱ्या कियेक गोष्टींनीं जरी शोकार्ह, तरी या गोष्टीनें ईर्षापात्र खरें, असें उघड बोलून दाखवावें. सारांश पहिल्याच भेटीसरशी मला पाहिल्याबरोबर तो इतका मुरून गेला कीं, माझ्या पात्रापात्रतेबद्दल अधिक तपास करण्याच्या भानगडींत न पडतां मला वरण्या विषयीं त्यानें एकदम आपला निश्चय दाखविला.

त्यानें आपली सूचना मी मान्य करावी ह्मणून, ज्या माझ्या एका नातलग बायकोला मध्यस्थींत घातलें होतें, ती मजकडे आली, आणि भाषणें चालतां चालतां असें ह्मणाली कीं;— 'आलिकडे जे वृत्तांत आपल्याला कळले, ते सर्व विश्वसनीय आहेत, त्या अर्थीं तुझा पति फेझ राज्यांत मृत्यु पावला, ह्याबद्दल तिळमात्र

संशय नाहीं; यासाठीं या उपर तूं आपलें सौंदर्य व तारुण्य ह्यांला कोंडून ठेवावें, हें योग्य दिसत नाहीं. आपल्या मृतपतीच्या वियोगाबद्दल तूं जें दुःख केलें तें फार झालें; अतःपर विवेकानें शाहाणपणा धरून तें दुःख विसर आणि माझी सूचना मान्य करून आपला सांभाळ कर. तूं त्या मार्किसाला मान्यता दे, आणि एकदम सुखांत बुडी मार, ह्मणजे पूर्व दुःखाचा लेशही राहाणार नाहीं. तिनें आपल्या कोटीच्या पुष्टीकरणार्थ मला त्या मार्किसाची वंशावळ, दौलत आणि मोठी अब्रू ह्यांबद्दल व्याख्यान दिलें. परंतु तिचें वाग्पांडित्य माझ्या मनाला द्रव न आणतां व्यर्थ जाऊं लागलें. दान अल्वाराच्या मृत्युविषयीं मला संशय होता, अथवा तो एकाएकीं दत्तकन् येईल अशी भीति होती, ह्मणून मी अड धरीत होतें, असें नव्हे; पण पहिल्याच लग्नाचे सोहळे असे विपत्तिकारक झाले, तेव्हां फिरून दुसरें लग्न करण्याचा मला मनापासून कंटाळा असे, हेंच माझ्या नातलगांचा अत्याग्रह अमान्य करण्यास मला मुख्य कारण होतें. इतकेंही झालें, तरी ती मध्यस्थबायको कांहीं डगमगली नाहीं. दानआम्ब्रोशाचें एवढें नाजूक काम मोठ्या उत्कंठेनें आणि सफळतेनें बजावण्याचा निश्चय धरून ती नाना प्रकारच्या युक्ति लढवूं लागली. तिनें माझ्या कुटुंबाच्या सर्व माणसांचा ओढा मार्किसाकडे लाविला. तीं सर्व माणसें मला सांगूं लागलीं कीं, असा सुखकारक संबंध कधींच झिटूकारूं नये. मी

कबूल व्हावें ह्मणून त्यांनीं क्षणोक्षणीं उपदेश करकरून माझ्या कानटाळ्या बसविल्या आणि चोहोंकडूनहीं मला उचबळ करून त्रास आणला. सारांश दिवसे दिवस वाढत जाणारी माझी लाचारी व निराशा, ह्यांहींकरून लवून गेलेल्या माझ्या कोमल मनोवृत्ति, त्या सुहृज्जनांच्या तीव्र व प्रखर उपदेशापुढें झोंके खाऊं लागल्या.

मार्किसाला कसें चुकवावें, हें जेव्हां मला कळेनासें झालें, तेव्हां अर्थात् आपल्या नातलगांच्या आग्रहास मार्ग देऊन मी त्याला वरलें. लग्नाच्या दुसऱ्या दिवशीं आह्मी बर्गासाजवळ ग्रजल व गांदिलास ह्यांच्या दरम्यान मार्किसाचा एक वाडा होता, तेथें गेलो. त्याच्या मनांत मजविषयीं पराकाष्ठेची प्रीति उद्भवली; तो जें जें करी त्यांत त्यांत मला खुष करण्याहून त्याची दुसरी कसलीच इच्छा नसे. माझी मर्जी कोणत्या प्रकारें मिळवावी, हाच कायतो त्याला नूतन निजध्यास लागला होता. आपल्या बायकोवर असा फिदा होणारा व तिजकडे इतकी शुद्ध व अतोनात भक्ति ठेवणारा दादला ह्या जगांत आजपर्यंत दुसरा कोणीच झाला नसेल! आमचीं वयें जरी परस्पर इतकीं विजोड होतीं, तरी त्याची ती शुद्ध भक्ति व तल्लीनता, ह्यांची फेड तशाच प्रकारांनीं केल्याशिवाय माझा जीव राहिला नसता, पण माझे सर्व कोमल संकल्प दानअल्वाराच्या थडग्यांत पुरून गेले होते, त्यामुळें माझ्या औदासिन्यानें मला घट्ट आव

रून धरलें होतें. माझें सत्वधीर अंतःकरण ह्या दुसऱ्या सोहळ्याकडे उघडें पडेना. मला आपल्या प्रथम पतीची आठवण होऊन ह्या द्वितीय पतीचे सर्व ममतादर्शक प्रयत्न पाण्यावरील रेषांसारखे होत. नुसते कोरडे आभार मानून व मान डोलवून मी ह्या प्रकारांची फेड करीं; दुसरी कोणतीच तऱ्हा करणें हें माझ्या शक्तींत नव्हतें.

यांप्रकारें माझ्या मनाची स्थिति झाली होती. एका दिवशीं मी आपल्या खोलीच्या खिडकीशीं हवा घेत उभी असतां समोरील बागांत एक कुणब्यासारखा दिसणारा माणूस मजकडे टक लावून पाहातां नां माझ्या दृष्टीस पडला. तो कोणी तरी सामान्य मजूर असावा, असें मला वाटलें. ह्या गोष्टीबद्दल त्या वेळीं मला कांहींच वाटलें नाहीं; परंतु दुसऱ्या दिवसीं तोच मनुष्य त्याच ठिकाणीं उभा राहून परत तशाच एकसारख्या नजरेनें मजकडे पाहात आहे, असें मी पाहिलें. मला हा प्रकार विलक्षणसा वाटला! मीही परतून त्याजकडे पाहिलें आणि लक्षपूर्वक अवलोकनांतीं दुर्दैवी **दानअल्वाराच्या** कांहीं रूपरेषा त्याच्यांत दिसूं लागल्या. जसा काय **दानअल्वारच** आपल्या थडग्यांतून उठून आला, असा भास होऊन माझ्या निद्रिस्त पडलेल्या प्राणव्यथा पुनः जागृत झाल्या व मी किंकाळी फोडली. बरें झालें कीं त्या वेळीं मी आपल्या **इनेसनामें** दासीसह एकटीच होतीं. सर्व चाकरांत माझ्या पूर्ण विश्वासाची कायती

हीच दासी होती. कोणत्या भावनांनीं मी अशी व्यथित होऊन ओरडलें, तें मी तिला सांगितलें. हें ऐकून ती हंसली आणि थोडक्याशा प्रतिभासानेंच मला इतक्या घोटाळ्यांत पाडलें, असें तिनें स्थापित केलें. ती ह्मणाली;– 'बाई साहेब, उगीच घाबरूं नका, धैर्य धरा आणि आपल्या प्रथम पतीचा आभास खरा मानूं नका. तो कुणब्याचा वेष घेऊन एथें येईल, असा किंचित् तरी संभव आहे काय? तो अद्याप जीवंत आहे, असें ह्मणण्यास कांहीं तरी आधार आहे काय? सर्व होऊन चुकल्या बद्दल सप्रमाण खातरी झाल्यावर असा संशय घेण्यास मुळींच जागा उरलेली नाहीं. तथापि आपली मळमळ काढून टाकण्यासाठीं मी बागांत जाऊन त्या कुणब्याशीं चौकसी करतीं. तो कोण आहे, हे समजून घेऊन मी लागलीच आपल्याकडे परततीं.' इनेस टिटवीसारखी धांवत गेली, पण लवकरच आश्चर्ययुक्त व्यग्रमुद्रेनें परत मजकडे आली, आणि ह्मणाली; 'बाईसाहेब, आपला तर्क खोटा नव्हे; ज्याला आपण पाहिलें, तो खराच **दानअल्वार** होय; त्यानें एकदम आपण कोण, तें मला कळविलें व आपल्याशीं एकांतीं भेट घेण्याचा इरादा दाखविला.' **मार्किस बर्गासाला** गेला होता, तेव्हां लागलाच **दानअल्वाराला** घरीं आणण्यासारखी सवड मिळाली. मागच्या जिन्यानें त्याला माझ्या खोलींत आणण्याविषयीं मी आपल्या दासीस सांगितलें. यावेळीं माझें चित्त कसें

व्यग्र झालें असेल आणि माझी कशी दाणादाण झाली असेल, त्याबद्दल तुम्हींच चांगली कल्पना करा-ल. मजवर दोषवचनांचा भडिमार करण्यास ज्याला हक्क, अशा पुरुषाच्या सान्निध्यापुढें माझ्यानें कसा बरें टिकाव काढवेल ! तो व इनेस एका क्षणांत मजकडे आलीं, त्याबरोबर मी मूर्च्छित होऊन त्याच्या पायांकडे पडलीं. त्या दोघांनींही मला सावध करून वर उठविलें; तेव्हां दानअल्वार ह्मणाला;—बाई, ईश्वराकडे पाहून एकदाची समाधान पाव. मी प्रकट झालों, ह्मणून तुला कोणत्याच प्रकारें खेद होऊं नये; अथवा कांहीं झालें तरी मीही तुला तिळमात्र काळजींत टाकणार नाहीं. मी एकादा रानटी नवऱ्यासारखा आपल्या लग्नाचा दावा सांगण्यास आलों आहे, असें तूं बिलकूल समजूं नको; दुसरें, तूं जो द्वितीय पतीशीं विवाह केला, त्यांत तुझा कोणताही दूषणास्पद उद्देश होता, असेंही मी समजत नाहीं. हें तूं आपल्या सुहृत्संबंधी व मित्रवर्गाच्या अत्याग्रहामुळें केलें व त्यांनीं तुझा कसा पाठलाग केला, इत्यादि सर्व प्रकार मला पुरते ठाऊक आहेत. याशिवाय वालादोलिदांत माझ्या मरणाची वार्ता पसरली होती, आणि मजकडूनही तुला मुळींच पत्र आलें नव्हतें, त्यामुळें ती वार्ता खोटी मानण्यास दुसरा कसलाच आधार तुला सांपडला नाहीं, ह्मणून तूं ती खरी मानली हेंही मी जाणतों. एवंच दुष्ट प्राक्तनानें आमचा वियोग घडल्या पासून तूं कोणत्या प्रकारें चाल चलणूक ठेवि-

ली, हें सर्व मला श्रुत आहे; आणि केवळ अनिवार्य कारणामुळें—नीच अंतःकरणानें नव्हे—तूं रसण्याच्या .... .... ....'; पुढील शब्द तो बोलणार होता, इतक्यांत मी स्फुंदत स्फुंदत मध्येच बोलले कीं:— अहाहा! महाराज, आपल्या अपात्र नायकोला क्षमापात्र असें आपण कां समजतां? ज्या अर्थी सटिपालकानें आपल्याला पूर्णायुष्य दिले आहे, त्या अर्थी ती दोषपात्र खरी. दानआम्ब्रोशाशी लग्न करण्यापूर्वी जसी मी निराश्रित राहून आपले वियोगदुःख सहन करीत होतीं, तसी अजूनही राहतीं, तर काय होतें!—कटकटा! कसी दुर्भागी मी! हा द्वितीय विवाह कसा तरी मला घातक झाला! ज्या वस्तूच्या पहिल्यानें मी आपले तनमन अर्पण केलें, त्या वस्तूचा नाश झाला, अशा मिथ्याभासांत पडून मी परस्वाधीन झालीं; आणि आतां तीच आपल्या जिव्हाळ्याची वस्तू मी आपल्या समोर पहातीं. दैवाची करणी विचित्र आहे! हे दैवा! असा माझा छळ त्वां केला तो केला, पण आतां माझ्या अंगीं लज्जेचा लवलेश न ठेवितां, मला आपल्या प्रियनाथाला पुरेपणीं डोळे भरून पाहाण्याचें सामर्थ्य तरी दे.

असा माझा अनुताप पाहून दानअल्वार अगदीं वेधून गेला आणि उदासीन मुद्रेने ह्मणाला:— 'प्रिये मेन्शा, मी तुजबद्दल कसलेंच गाऱ्हाणें सांगत नाहीं; तूं जें सांप्रत अनुपम सुख भोगीत आहेस, त्याबद्दल तुला हृदयभेदक भाषणांनीं छळावें, अथवा तुझीं

असे काढावे, हा माझ्या ध्यानीं मनीं देखील नाहीं. उलट तुझे सुख पाहून मी संतोष मानतो; हे अंतरसाक्षी ईश्वर मात्र जाणतो. कालादोलिदाहून निघून गेल्यापासून माझे दैव तरी निखालस उलटून गेले आहे; माझे आयुष्य जसें काय सर्व विपत्तींच्या जाळ्यासारखे झाले आहे; आणि ह्याच जाळ्यांत सर्वस्व अडकून पडल्यामुळे तुला खबर कळविण्यासही मला भान राहिलें नाहीं. सार्वकाल तुझ्याच काळजीने ग्रस्त होत्साता, मी जो तुला प्रीतीचा चटका लावून गेलो. या घातक चटक्यामुळे माझ्या मागून तुझी कशी अवस्था झाली असेल कोणजाणे, ह्याच झुरणीत मी होतो. जागृतींत सर्वदा मनोव्यासंग काय तो हाच. आणि निद्रेतही ह्याचीच स्वप्नें पडावीं. दीनामेन्शा आपल्या डोळ्यांतून अश्रु गाळत आहे, असे मूर्तिमंत मला दिसल्यासारखें होऊन वारंवार माझे प्राण व्याकुळ व्हावे; माझ्या सर्व संकटांत हें तुझें स्मरण मला अत्यंत जाचक होई. केव्हां केव्हां मला असें वाटावें कीं, मी जो तुला असा प्रीतीचा चटका लावला, तो माझ्या हातून मोठा अपराध घडला. तूं जी माझी सरफराजी केली, ती तुझी तुला उलटी नडली; ह्यासाठीं मला सोडून तूं दुसऱ्या कोणत्याही दैवशाली पुरुषाला वरलें असतें, तर फार चांगलें होतें, असेंही माझ्या मनांत येई. आतां मी आपली रडकथा लांबवीत नाहीं:—सात वर्षे पर्यंत असें दुःख भोगल्यावर तुजवर एकदा तरी डोळा टाकायाला मिळतें तर पाहावें,

अशी इच्छा मला होऊं लागली. लोक मला ओळखून पकडतील, हें भय तर एकीकडून वाटे व व्यर्थ संकटांत पडावें हें बरोबर नाहीं, ह्मणून मन घट्ट करून होतों, तेथेंच राहाण्यासाठीं इलाजही करीं, पण तुला पाहावें, असी एकवेळ मनांत जी हुरशी भरली ती कांहीं केल्या आवरेना. ज्या मुदतीनें मी दुसऱ्याकडे गुलाम राहिलों होतों, ती मुदतही ह्या सात वर्षांत संपून मी मोकळा झालों होतों; अर्थात्, कदाचित् ज्या अडचणीमुळें पाय बाहेर काढण्यास मिळाले नसते, ती अडचण दूर झाल्या वरून माझ्या इच्छेचा वेग अनिवार्य होऊन तो शांत करण्यासाठीं मी ह्या वेषानें **वालादोलिद** एथें आलों. या ठिकाणीं मला सगळी कथा समजली. नंतर मी ह्या वाडींत आलों व कांहीं उपायांनीं बागवानाची मर्जी मिळवून त्याजकडे मजूर राहिलों. तुझ्या दर्शनाच्या प्राप्तीसाठीं मला एवढा व्यूह रचावा लागला. आतां मी तुला पाहिलें: माझी इच्छा तृप्त झाली. याउपर एथें राहून मीं तुझ्या भावी सुखाला व्यत्यय आणीन असें तूं बिलकूल समजूं नको. मी आपल्या प्राणांपलिकडेही तुझी कळकळ वागवितों. तुला स्वस्थ व सुखी पाहावें हेंच काय ती माझी इच्छा. तुला एकवेळ पाहाण्या विषयीं माझें अंत:करण धापा देत होतें, त्याचीही सुटका झाली. आतां ज्या अर्थी माझें जीवित्व याउपर तुझ्या सेवेस पात्र नाहीं, त्या अर्थी परत देशाटनास जाऊन आयुर्मर्यादा संपे तोंपर्यंत कसाही

काळ कंठून राहावें, याशिवाय दुसरें कांहींच कर्तव्य राहिलें नाहीं.

हे शब्द ऐकतांच मला आवेश आला व मी म्हणालीं:—नाहीं, **दानअल्वार**, नाहीं. एकवेळ तूं माझा त्याग केला तो केला; दुसऱ्या वेळींही मी तुला तसें करूं देणार नाहीं. तूं प्रवासास जा, अगर कांहींहि कर, मी तुला तुझ्या कोणत्याही स्थितींत सोडणार नाहीं, पण तुझी जन्माची सोबतीण होऊन राहीन. ह्या घटिकेपासून यदाकदाचित् आमचा वियोग घडण्याचा प्रसंग आलाच, तर तो मृत्यूमुळें मात्र येईल.' हें माझें निर्धाराचें भाषण ऐकून त्यानें उत्तर केलें;—'मी सांगतों तें ऐक आणि **दानआम्ब्रोशो** बरोबर रहा; माझ्या विपत्तीची विभागी होऊं नको; तिच्या अखंड भाराखालीं मला एकट्यालाच दडपूं दे.' ह्याप्रकारें त्यानें मला बराच उपदेश केला; पण माझ्या बऱ्या साठीं वळीं जाण्याविषयीं तो जशीजशी अधिकाधिक इच्छा दाखवी, तशी तशी त्याच्या उदार स्वभावावर आपलपोटेपणा धरण्याची इच्छा मला कमी कमी होई. शेवटीं आपल्याबरोबर निघून येण्याविषयीं त्यानें जेव्हां माझा दृढनिश्चय पाहिला, तेव्हां त्याच्या भाषणाचा सूर एकदम परतला आणि तो प्रसन्न मुद्रा करून म्हणाला:— 'प्रिये, सांप्रत जें तूं उदंड संपत्तिसुख भोगीत आहेस, त्या सर्वांवर लात मारून ज्या अर्थीं तूं **दानअल्वारा** बरोबरच विपत्ति भोगण्यास सिद्ध झाली आहेस, त्याअर्थीं चल, उठ, आपण **गालिशा** प्रांतांत

**बितान्कुस** एथें जाऊन राहूं; तिकडे आपल्याला सुरक्षित स्थान सांपडण्याजोगें आहे. माझ्या दुर्दैवानें जरी माझी संपत्ति लयास गेली, तरी माझे मित्र अजून आहेत; ते इतके विश्वासू आहेत कीं, तुला अचानक उचलून नेतां यावें ह्मणून त्यांनीं मला सर्व प्रकारचीं आवश्यक साधनें पुरविलीं आहेत. त्यांच्या सहायानें **झामोरा** एथें एक रथही मी तयार करून ठेविला आहे, खेचर व घोडे विकत घेतले आहेत; आणि **गालिशिएन** लोकांपैकीं तीन मोठे शूर स्वार मजबरोबर येणार आहेत. हे स्वार दामे व पिस्तुलें इत्यादि हत्यारानिशीं सिद्ध राहून **रोदिलास** एथें माझी वाट पाहात आहेत. मी, हूं ह्मटलें, कीं ते सर्व तयारीनिशीं निघाले. **दानआम्ब्रोशो** एथें नाहीं, तोच संधि साधून घेऊं या. मी वेसीवर रथ आणवितों, ह्मणजे झालें. आपण आतां एका क्षणाचाही विलंब नलावितां कूच करूं.' ह्या गोष्टीला मी लागलीच मान्य झालीं. **दानअल्वार** वायुवेगानें **रोदिलास** एथें गेला आणि डोळ्याच्या पापण्या हालण्यापूर्वीं आपल्या सर्व सरंजामासह परत आला. माझ्या सर्व दासी हा चमत्कार पाहात होत्या, असें असतां त्यानें मला रथांत घातलें व हां, हां, ह्मणतां रथ हांकून पलायन केलें. त्या बिचाऱ्या दासींला ह्या पुंडाव्याचा अर्थच समजेनासा होऊन त्या तोंडांत बोटें घालून तटस्थ व घाबऱ्याघुबऱ्या होत्सात्या पळून गेल्या. एकटी **इनेस** मात्र आमच्या गुप्त व्यवहाराची वाकबगार होती. मी तिला आपल्या बरोबर

चलाविलें, पण **दानआम्ब्रोशोच्या** मर्जीतील एका चाकराशीं तिचा प्रीतिसंबंध होता, ह्मणून ती मान्य झाली नाहीं.

**दानअल्वाराबरोबर** रथांत बसतानां मी, दुसरें लग्न होण्यापूर्वीं जे आपले खासगी **कपडेलत्ते** व दागिने होते, ते मात्र घेतले; कारण **मार्किसा** कडून मिळालेल्या देणग्या आपल्या उपयोगास लावाव्या हें रास्त नव्हे असें मला वाटलें. आह्मीं **गालिशा**-चा मार्ग धरला; कदाचित् नेमलेल्या स्थळीं आह्मी सुरक्षित जाऊन पोंचूं, असेंही आह्माला वाटलें नव्हतें. **दानआम्ब्रोशो** परत घरीं आल्यावर लागलाच आमचा पाठलाग करण्यासाठीं प्रसंगवशात् आह्मांहूनही अधिक माणसें पाठविता, ही भीति होतीच. दोन दिवस पर्यंत आह्मीं निर्विघ्नपणें मार्ग क्रमिला व तिसरा दिवस-ही तसाच जाईल, ह्या आशेनें खुषमौजेचीं भाषणेंही केलीं. **दानअल्वार** आपल्या मरणाची खोटी वार्ता उठ-ण्याला कोणकोणते दुःखकारक योग घडले आणि पांच वर्षें गुलामगिरींत लोटून आपल्याला कशी मोक-ळीक मिळाली, इत्यादि हकीकत सांगत होता, इतक्यां-त काल **लियान**च्या रस्त्यावर ज्या टोळींत तूं होतास, ती वाटमाऱ्याचोरांची टोळी आम्हांला भेटली; त्या चोरट्यांनीं ज्या गृहस्थाला त्याच्या परिचाऱ्यांसह ठार मारलें, तोच **दानअल्वार** आणि सांप्रत माझ्या नेत्रा-तून अश्रुधारांचा जो लोट चालला आहे, तो त्या साठींच.

## भाग १२

### मध्येंच एक विघ्न घडतें.

इतकें सांगून होतांच **दोनामेन्शा** दुःखाश्रूंनीं **अगदी** विरघळून गेली. आपल्या दुःखाला मार्ग मोकळा करतांनां मींही तिला अडथळा आणला नाहीं; पण तिजबरावर मलाही रडूं आलें. दुःखग्रस्त लोकांचे कळवळे पाहून व तशांतही अशी सकुमार बायको विपत्तींत पाहून कोणालाही स्वभावतः दुःख झाल्यावांचून राहाणार नाहीं. पुढें ह्या सांप्रतच्या अडचणींतून पार पडण्यासाठीं तिनें कोणती युक्ति करावी, तिजबद्दल आह्मीं परस्पर भवंति नभवंति करणार होतों, इतक्यांत एकाएकीं मध्येंच एक विघ्न घडलें. भटारखान्यांत एकदम कसलासा गोंगाट सुरू झाला, तेणेंकरून आमच्या भाषणाचा बेरंग होऊन आमचे कान त्या गोंगाटाकडे लागले. हा, हां, ह्मणतां फौजदार व त्याचे दोन तीन शिपाई, आह्मीं होतों त्या ठिकाणीं आले. त्यांजबरावर एक तरुण गृहस्थ होता, तो सगळ्यांच्या आघाडीस येऊन माझ्या अंगावरील पोशाखाचे एकून एक कपडे ओरबाडून घेऊं लागला; त्यानें विचारपूस करण्याचीही वाट पाहिली नाहीं; व कपडे ओळखण्याचेंही कारण त्याला पडलें नाहीं. तो ह्मणाला;—'मी ईश्वराला स्मरून सांगतों कीं, ही जी ह्याच्या अंगांत बंडी आहे, ती निःसंशय माझी. ह्या पहा, सर्व खाणाखुणा मिळतात; जसा त्या

घोड्यावर माझा दावा आहे, तसा ह्या बंडीवरही आहे. बस, माझ्या मुचळकयावर, ह्या छेल्याच्या मुसक्या बांधून न्या; चोरीचा पोशाख चढवून नटवा बनून आला आहे! ह्या प्रांतांत छपून राहाणाऱ्या दरोडेखोरांपैकीं व हाही एक दरोडेखोर आहे.'

हे शब्द ऐकतांच, ज्या गृहस्थाला त्या चोरांनीं लुटून मला वस्त्राभरणें केलीं होतीं, तोच हा गृहस्थ, असा मला उघड तर्क झाला; आणि माझी गाळण होऊन एक शब्दही मला सुचेना. मी इकडे तिकडे बावरत पाहूं लागलों, पण माझ्या दृष्टीस कोठेंच माल सांपडेना. फौजदाराचें काम तरी संशयावरून व एकाद्याला पकडून चौकशी चालवायाचें हेंच; तेव्हां त्यानें मला गुन्हेगार केलें आणि ती बायकोही माझी-च साथी आहे, असें समजून आम्हांला निरनिराळ्या पाहाऱ्यांत ठेविलें. हा न्यायाधीश तुमच्या इतर न्या-याधीशांसारखा निष्ठुर व एकदम गळफासा विषयीं व्याख्यान देणारासा दिसला नाहीं: आपल्या चेहे-ऱ्यावरून तर तो मौजी व हास्यमुख दिसला, पण चेहेऱ्यासारखेंच त्याचें हृदयही होतें कीं नव्हतें, हें सर्व-साक्षी ईश्वरालाच ठाऊक! मला चौकींत आणतांच तो आपल्या जथ्यानें आंत आला. अशा प्रसंगीं कोण-कोणते व्यापार करायाचे, त्यांबद्दल त्यांला पूर्ण ज्ञान होतेंच:— त्यानीं माझा झाडा घेण्यास सुरुवात केली. त्या देशमुखांला हें भलें गुन्हेगार कूळ सांपडलें! ते मुठी भरभरून पिस्तोल काढूं लागले व प्रत्येक वेळीं

त्यांची चंद्री निरनिराळ्या प्रकारांनीं फिरूं लागली. त्यांच्या डोळ्यांत क्षणोक्षणीं आनंदाच्या लहरी चमकूं लागल्या ! फौजदार तर देहभानच विसरल्यासारखा झाला ! त्याच्या सगळ्या फौजदारी कारकिर्दींत त्याला असी धण कधींच पडली नव्हती ! तो मृदुस्वराने मला ह्मणाला; 'माझ्या माणकुल्या मुला, आह्मीं फक्त आमचें कर्तव्य कर्म बजावीत आहो; आपल्या हाडांचा चुरा होईल ह्मणून तूं पूर्वीच घाबरूं नको: जर तू पात्र नसलास तर उगीच आह्मीं तुझीं हाडें चुरणार नाहीं.' लग्नाच्या गोड गोड गोष्टी सांगून ह्या रक्तशोषकांनीं सारावेळ चाचपून चाचपून माझे गजवे रिकामे केले. दुसरें काय सांगूं? त्या ह्यांच्याच पातालवासी ज्येष्ठ बांधवांनींही मर्यादेची थोडीशी भीति धरून जें मजकडून बुचाटून घेतलें नव्हतें, तें देखील ह्यांनीं घेतले— माझ्या मामानें मला जे चाळीस दुकत दिले होते, ते मी जिवाच्या जतनेनें आजवर सांभाळिले होते. हे दुकत मला आसडतांना पहिल्यानें त्यांच्या हाताला कोठेंच अडखळले नव्हते, पण त्यानीं हळू हळू मोठ्या सधीरतेनें मला दोन तीन आवृत्तींनीं आसडलें व नखशिखांत तपासून फस्त केलें, त्या तडाक्यांत ते बिचारे दुकत कोठले राहायाला ! ह्या निर्लज्ज लोकांनीं मला नग्न केलें; ह्यापरतें दुसरें काय सांगूं! होय, घेतां काय? तसें त्यानीं केलें नसतें, तर चुकून सवरून एकादी राजमुद्रा कोठें तरी वळचणीच्या जागीं चिकटून राहाती ! झाडा घेण्याची ह्मणून आतां बाकी उरली नाहीं,

असें जेव्हां फौजदारानें पाहिलें, तेव्हां चौकशी चालविण्याची वेळा झाली, असें त्याला वाटलें. मी आपली खरी हकीकत त्याला सांगितली व त्यानें माझी जबानी लिहून घेतली. ह्या वेळीं इत्यर्थ काय तो इतका ठरला कीं:—त्यानें माझी सर्व चीजवस्त घेऊन आपल्या शिकारी कुत्र्यांसह परत जावें आणि मला एक चिंधी-ही न ठेवितां गवताच्या एका भिकार चुंबळीवर हाथा हूया घालीत टाकावें. !

मी जेव्हां अशा निराश्रित व विपत्तिकारक स्थितींत पडलों, तेव्हां दुःखाचे सुसकारे टाकून ह्मटलें:—'अरेरे! हें मानवी आयुष्य किती तरी आपदांनीं वेष्टित आहे बरें! ह्या आयुष्यांत आपल्याला अमुकच वेळीं अमुकच गोष्ट घडेल, हें कोणाच्यानें तरी सांगवेल काय? या जगीं आमचीं सर्व कृत्यें व सर्व कल्पना समुद्रांतील लाटां सारख्या आहेत. **ओविडोहून** निघाल्यापासून मी तरी कशा कशा संकटांत सांपडत गेलों, तें पहा! सूक्ष्म विचारानें पाहिलें तर, ही तरी एका प्रकाराची मौजच वाटते! युक्ति प्रयुक्ति लढवून एका संकटांतून पार पडलों, तों दुसऱ्या अरिष्टांत पडायाला उशीर तरी लागायाचा होता! तें जसें काय मजकरितांच संग्रहीं होतें! हें चांगलें शहर ह्मणून एथें आलों, तर ह्या फौजदाराच्या परिचयानें प्रतिष्ठा मिळेल हें कोणी अभाग्यानें भाकीत केलें होतें! एवंच माझ्या कपाळाची दगदग कांहीं सुटत नाहीं. ह्याप्रमाणें मी आपल्या मनाशीं संलाप करित असतां, परत एकदां ह्य

बंदीची व धनाची मला आठवण पडली. व ह्यान दुष्ट वस्तूंनीं मला अरिष्टांत घातलें. ह्मणून त्यांस असह्य शाप दिले. नंतर थोडेंसें धैर्य आणून ह्मणालो, कांहीं चिंता नाहीं, जिल्ब्लास, बेफिकीर रहा! असा कुकुट छातीचा होऊं नको! पाताळांत पडला होतास, तेथून सुद्धां तूं आपल्याला पार पाडलें, मग ह्या पृथ्वीवरील कारागृहाची कथा ती काय? पण हे दैवा! रानांतून बाहेर पडण्यापूर्वींच मी कुई घालतो कीं! लिंओनार्दा व दोमिंगो ह्यांहून अधिक वाकबगार माणसांच्या हातीं मी सांपडलो आहे. माझ्या चावीने हा दरवाजा उघडला जाणार नाहीं! पैशाशिवाय बंदीवान हा पंखाशिवाय पक्ष्यासारखा होय, असेंच आतां ह्मटले पाहिजे. एथून उडून दूर जाण्यास एकाद्याला पुरे पंख पाहिजेत.

ह्या धांदलींत आमच्या न्याहारीसाठीं तयार झालेले मांस तेथेंच पडलें; त्याचें काय झालें तें मला ठाऊक नाहीं; पण येथें मला पिकुटशा निस्तेज भाकरीचा एक तुकडा, व तो चावतांनां अधिकसे श्रम पडूं नयेत ह्मणून पाण्याचें एक गाडगें इतकें मिळालें. ह्याप्रमाणें ह्या अंधारकोठडींत अन्नीन चावत पडून रहाणें माझ्या दैवीं आलें. पंध्रा दिवस असे गेले. मजवर देखरेख ठेवणारा काय तो रोज माझ्या दृष्टीस पडे, त्यावांचून दुसरा कोणी पाहीन तर शपथ! मला त्या भाकरी पाण्याची उणीव पाडूं नये, असी ह्या देखरेख ठेवणाराला ताकीद होती, ह्मणून तो तरी तेथें येई. तो आला

ह्मणजे त्याची मर्जी संपादन करण्यासाठीं अमळ गमजा गुळवण्या लावण्याचें माझ्या मनांत येई, पण तो वस्ताद् पक्का घुमा ! मजकडे पहातच नसे. येऊन जाऊन मी कोठेंतरी निसटेन सबब ह्यावरच त्याची नजर असे. सोळाव्या दिवशीं फौजदाराची स्वारी माझ्या कोठडींत आली; तो पत्राजीनें ह्मणाला कीं;—तूं नसीबवान आहेस ! तुला सांगण्यासारखी कांहीं खबर मजकडे आहे. त्या बाईची रवानगी बर्गास एथें केली. रवानगी होण्यापूर्वीं मी तिची चौकशी केली, त्यावेळीं तिनें जे जबाब दिले, त्यांवरून तुझ्या निरपराधीपणास बरीच बळकटी आली आहे. पिनेफ्लार पासून केकाबिलासास तुला ज्या ओझेल्यानें नेलें, त्यानें आजच येऊन ती गोष्ट खरी असें ह्मटलें, तर तूं आजच मोकळा होशील. तो हल्लीं आस्तोर्गा एथें आहे. मी त्याला बोलावणें पाठविलें आहे, व तो एथें येईल असी मी अपेक्षा करतों. जर त्यानें ती तुमच्या पळापळीची गोष्ट कबूल केली, तर तुला कोणीच विचारता नाहीं; तुझा तूं मालक.

हे शब्द एकतांच मी आनंदाच्या भरानें देहावसान करण्याच्या बेतांत आलों. बस ! झालें, काम झालें ! थोडक्याच वेळांत माझी दया आणून संक्षिप्त रीतीनें निवाडा केला, ह्मणून न्यायाधीशाचे मी आभार मानले आणि पुढेंही थोडी बहुत लाडी गोडी लावणार होतों, इतक्यांत तो खेचरहाक्या मागून पुढून एकेका शिपायासहित येऊन ठेपला. त्याचें तोंड माझ्या नजरेवरून

जातांच मी त्याला ओळखलें; पण ह्या चोरानें माझी घोंगडीची थैली व तींतील जिन्नसा चोरल्या होत्या: हे सामान त्यानें विकलें असावें; त्या विक्रीच्या पैशाचा लोभ त्याला सुटेना, ह्मणून जाणून बुजून आपण मला मुळींच ओळखत नाहीं, व जन्मापासून आपली व माझी कधींच भेट झाली नाहीं, असें सांगणें त्याला भाग पडलें. मी ह्मटलें; अरे लुच्या ! टेंक, गुडघे टेंक आणि तूं माझे कपडे चोरले नाहींस असें कबूल हो पाहूं ! सत्याचा कांहीं तरी मान राख ! वर मान कर आणि माझ्या तोंडाकडे पहा; ज्या कित्येक सावळ्या तरुण लोकांस अंडपाशाचें भय घालून त्या **केकाबि-लास** शहरांत त्वां फसविलें, त्यापैकींच मीही एक नव्हे काय ? खेचरहाक्या गुडघे टेंकून ह्मणाला कीं; 'ह्या दादाला मी मुळींच ओळखत नाहीं, हें परमे-श्वरास स्मरून सत्य सांगतों.' हा जेव्हां मुळींच कबूल होईना, तेव्हां पुढें दुसरी चौकसी करण्यासाठीं मला परत चौकींत पाठविलें. **झिल्ब्लास**, पुनः एकदां दम खा ! एथें धड मेजवानीही नाहीं व उपोषणही नाहीं, पण भाकरीचा तुकडा आणि पाणी ह्यांशींच कायती गांठ आहे; व येऊन जाऊन इतकेंच काय ते हाल होतील, आणि त्या पत्राजखोर घुम्या नाझराची दृष्टी चुकवायाला कांहीं बुद्धि खर्च करावी लागेल, इतकेंच कायतें. पण कायद्याच्या जबड्यांतून मुक्त व्हायाला इखलासा निरपराधीपणा शाबूद झाला पाहिजे, तो होत नाहीं, असा विचार जेव्हां मला होई, तेव्हां

तो विचारच मला मरणप्राय होत असे; व मला माझें पातालभुवनच असतें तर बरें होतें, असा ध्यास लागे. ह्या अंधारकोठडीच्या दु:खाहून तेथलीं दु:खें मला थोडीं होतीं, असें समजा. त्या वाटमाऱ्या चोरांशीं बरोबरी करण्यासारखा मी सुदृढ होतों! मी त्यांशीं थट्टा मस्करीनें व वाटमाऱ्याच्या आविर्भावानेंही दिवस काढून भावी मुक्ततेच्या गोड आशेवर राहीं; आणि एथें कसें? वस्तुत: मी निरपराधी आहें, तरी पुरावा नसल्यामुळें फांशीं जाणार!

---

## भाग १३.

### जिलब्लास चांगल्या नशीबानें बंदीशाळेंतून सुटतो व पुढें प्रवासाला निघतो.

ह्याप्रमाणें मनोरथसृष्टीच्या रचनेंत दिवस काढीत असतां माझीं सर्व साहसें जशीं काय ग्रंथांत लिहिल्या सारखीं शब्दश: सर्व शहरांत पसरलीं. लोकांला माझें प्रदर्शन करावेंसें वाटलें! एका मागून एक लोक माझ्या तुरुंगाकडे येऊं लागले. ह्यानीं माझ्या खोली-च्या खिडकींतून, जरी उजेडाची मारामारीच होती, तरी मजकडे डोकावून पहावें, व आपला रस्ता पक-डावा! हें एका नवीन प्रकारचेंच प्रदर्शन झालें. मला बंदींत टाकल्यापासून ह्या खिडकीशीं एकही सजीव प्राणी नजरेस पडला नव्हता; कचेरीकडच्या बाजूला ही खिडकी होती, व त्या कचेरींत मुखस्तंभ आणि धाक ह्यांचा खडतर पाहारा असे. ह्या प्रदर्शनानें

शहरांतील सर्व लोकांच्या तोंडीं मी झालो आहें, असा मला तर्क झाला; पण हा दुःशकुन किंवा सुशकुन होता, ह्याचा कांहींच तर्क मला होईना.

पहिल्यानें जे लोक मला पाहायाला आले, त्यांत तो मान्दोनेदोचा छोटेखानी गवय्याही होता. खेचर-हाक्यानें भय घातल्यावर रस्ता मिळेल तिकडे जी मंडळी पळाली, त्या मंडळीचाच हा सभासद होता; तेव्हां तो माझ्या सोबत्यां पैकींच एकजण ठरला, हे तुह्मांला माहीत असावेंच. मी त्याला लागलेंच ओळख ले; आणि तोही माझी ओळख कबूल करायाला चुण-चुणला नाहीं. आह्मीं एकमेकाला मोठ्या ममतेनें राम-राम केले, आणि एकमेकाला सोडून निघाल्यापासून परस्परांच्या हाल हवालांचा पडताळा घेतला. मला आपलें सगळें चरित्र पद्धतवारीनें त्याला सांगावें लागलें, व आह्मी घाबरून पळाल्यावर केकाबिलासच्या भटारखान्यांत ती बायको व तो खेचरवान ह्यांमध्ये कोणकोणते प्रकार घडले, ते त्यानें मला सांगितले. नंतर मला रामराम करून जेव्हां तो जाऊं लागला, तेव्हां माझ्या सुटकेसाठीं आपल्या शक्तीच्या पराका-ष्ठेपर्यंत श्रम करीन, असें मला अभिवचन देऊन तो गेला. त्याचे सोबती, जे केवळ मला पाहाण्यासाठींच आले होते, त्यांस सुद्धां माझें दुर्दैव पाहून दया आल्याचें चिन्ह दिसलें; त्यांनींही त्या गवय्याकडे माझ्या मुक्तते प्रीत्यर्थ होईल तेवढी मदत करण्या विषयीं आपण होऊन कबूल केलें.

ते आपल्या वचनास जागले, ह्यांत संशय नाहीं. त्यानीं माझ्या तर्फेनें फौजदाराकडे एक अर्ज गुजरला. फौजदारालाही माझ्या निरपराधीपणा, बद्दल अजून संशय राहिला नव्हता, तेव्हां त्यानें त्या छोटेखानी गवय्याची जबानी घेतांच आपल्या मनाचा फाड करण्यास कसलीच वानवा केली नाहीं. सुमारें तीन आठवडे गुजरतांच तो माझ्या कोठडींत आला व मला ह्मणाला;—'जिल्ब्लास,मी कोणत्याही प्रकरणांत कधींच गटमळत नाहीं; बस, आतां तुला मोकळा सोडला आहे; तुला जिकडे जायाचें असेल तिकडे जा. पण जर तुला बरावर घेऊन गेलों, तर तुला त्या चोरांचें तें भुयार परत शोधून काढतां येईल काय ? मी उत्तर केलें कीं,– 'नाहीं, महाराज नाहीं; ज्यावेळीं मी त्या भुयारांत गेलों, त्या वेळीं काळोखी रात्र होती व त्यांतून बाहेर पडतांनाही दिवस उगवण्याच्या पूर्वींच बाहेर पडलों होतों, तेव्हां अमुकच जागीं तें असावें, असा निश्चय माझ्यानें करवत नाहीं. ह्याउपर फौजदार साहेब निघून गेले, व जातांना मला सोडून देण्यासाठीं नाझराला हुकूम होईल असें बोलले. लागलाच मागून एका क्षणांत नाझर आपल्या जिलबीच्या माणसांतून एका जणाला बरावर घेऊन माझ्या अंधारगृहांत आला. त्या माणसाच्या खांद्यावर कपड्यांचें एक बोजकें होतें. त्या दोघांनींही चकार शब्द न काढतां मोठ्या समारंभानें माझ्या अंगावरील बंडी व सदरे काढून घेतले; आणि मला एक जीर्ण जुना

आह्मां गवय्यांच्या पट्टया त्या कसल्या ? त्या काय धर्माध्यक्षांच्या पट्टयां सारख्या असायाच्या ? तुला तर हें माहीत आहेच'. असें बोलून त्यानें ती थैली आपल्या खिशांतून बाहेर काढली व मोठ्या गौलताईनें माझ्या दोंहीं हातांमध्यें सारली. मींही अधिकाची आस्था न ठेवितां आदरपूर्वक तिचा स्वीकार केला. जसी काय सोन्याची खाणच त्यानें मला अर्पण केली, असें दाखवून मी त्याचे अत्यंत आभार मानले, आणि त्या देणगीच्या फेडीबद्दल त्याला सहस्त्रावधि वचनें दिलीं. जसीं काय नेमानें मोठी काळजी ठेवून यमदडाच्या दिवसीं पुरीं करायाचीं ! रोकड हातीं येतांच मी गपचुप शहरांतून बाहेर पडलों; माझ्या दुसऱ्या हितकर्त्यांचा निरोप घेण्यापुर्ता मला वेळ सांपडला नाहीं, पण मी अंत:करण पूर्वक त्यानां सहस्त्रश: आशीर्वाद दिले.

तो छोटेखानी गवय्या आपल्या थैलीविषयीं जें नीच स्वरानें बोलला, तें उगीच नव्हतें. ती थैली कांहीं दक्षिणमार्गी नव्हती. आज दोन महिने पर्यंत सांज सकाळ माझ्या कपाळीं चांगल्या अन्नाचे हालच आले होते, व आतां **बर्गोसापासून** जवळच्याच **पोन्तादिमुला** येथील ठाण्यावर पोंचलों, व जवळ पाहातों तों, थोडकासा चिल्लर खुर्दाच सांपडला. दैव माझें! त्याला दुसऱ्याचा उपाय काय? येथें **दोनामेन्शाची** चौकसी करण्यासाठीं मी उतरलों. ज्या खाणावळींत मी उतरलों, त्या खाणावळीची स्वामिणी कोणीसी एक

त्तगार अकसखोर सुकटीबाई होती. मला पाहातांच तिने ज्या मुखमुद्रा केल्या, त्यांवरून मीं लागलेंच जाणलें कीं, माझा झगा बाईच्या मनोरथावर थडकला नाहीं; तिच्या अभिरुचीचा हा एक दाखलाच मला सांपडला. तसाच मी मेजाशीं बसलों; भाकर व पन्हेर खाल्लें आणि थोडकीशी घाणेरडी दारू प्यालों. माझ्या बाह्य देखाव्याच्याच बरोबरीचें हें जेवण जेवीत असतां मी माझ्या खाणावळवाली बाईशीं सलगी करण्यासाठीं होतील तेवढे यत्न केले. मी तिला विचारलें:–'तूं **लागादयाच्या मार्किमाला** जाणतेस काय? त्याचा वाडा शहराबाहेर फार अंतरावर आहे काय? बरें, याच्या त्या बायकोची कशी काय हालहवाल आहे? तिनें कपाळाला आंठ्या घालून उत्तर केलें कीं;–'तूं एकादमांत पुष्कळ प्रश्न विचारतोस.' पण शेवटीं फारवेळ कपाळकूट करून तिच्या कडून मी इतकेंच काढून घेतलें कीं, **दानआम्ब्रोशाचें** ठाणें तेथून कांहीं अधिक दूर नव्हतें, सुमारें एका कोसावर होतें.

जेवून खाऊन झाल्यावर बरीच रात्र झाली होती–, म्हणून निजायाला जाण्याचा बेत करून मी तिला निजण्यासाठीं जागा विचारली. ह्यावर गर्विष्ठ व तिरस्कारयुक्त मुद्रेनें तिनें जबाब दिला कीं; 'काय? तूं निजण्यासाठीं जागा विचारतोस? पन्हेरच्या इवल्याशा तुकड्यावरच भोजन सारून नेणाऱ्या माणसाला निजण्यासाठीं मजकडे जागा नसते. माझ्या घरांतील सर्व बिछाने पूर्वींच गुंतून राहिले आहेत. अजून

आमचे शिष्ट शिष्ट पाहुणे यायाचे आहेत, व त्या पाहुण्यांसाठीं इकडील सर्व सोई राखून ठेविल्या आहेत; पण तूं मला चांडाळीण ह्मणशील, ह्मणून मी तुला सांगतीं कीं, तूं माझ्या दांडसाळींत हवा तर पड. तुझ्या मऊ चामडीला पेंढा लागला तर कांहीं इजा होईल असें मला वाटत नाहीं'. हें ती ठाऊक नसतां खरें बोलली.— तें निमूटपणें मी ऐकून घेतलें आणि आपल्या नेमून दिलेल्या अड्ड्याच्या जागीं कसरलों. येथें मी खंबीर पुरुषासारखा निजलों; कारण सिंहासारखा उद्योग करणाऱ्या पुरुषाला निद्राजनित विश्रांतिसुखाच्या मंदिरांत जाण्यासाठीं लागलाच परवाना मिळतो.

---

## भाग १४.

### बगांस एथें दोनामेन्शा जिलब्लासाला भेटून त्याचें आगतस्वागत करतो.

मी अजगरासारखा पडून राहिलों नाहीं, पण दुसऱ्या सकाळीं कोंबडा आरवण्याच्या पूर्वीं उठलों, व खाणावळवालीचे पैसे चुकविले. पूर्व संध्याकाळीं जशी ही बाई दिसली होती, तशी ह्यावेळीं दिसली नाहीं: किंचित् आटपशीर तोरा व जरा प्रसन्न चेहरा ह्यांचें थोडेंसें प्रदर्शन झालें. सरकारी तीन रखवालदारांच्या प्रसादानें ही गोष्ट घडली असावी असा मी तर्क केला. हे गृहस्थ त्या रात्रीं ह्या घरांत निजले होते: ते घरधनिणीच्या जिवाळ्याचे पाहुणे होते, असें उघड

दिसलें व ह्याच शिष्ट गृहस्थांसाठीं ते बिच्छाने गुंतून पडले होतें.

शहरांतून जातांना **मार्किसाच्या** वाड्याकडे कोणता रस्ता जातो, त्याबद्दल मी चौकसी केली. जातां जातांच रस्त्यावर एक माणूस भेटला. **पिनेफ्रोर** एथील भटारखान्याच्या मालकासारखाच हाही शाहाणा होता. तो माझ्या प्रश्नाचें उत्तर जितक्यास तितकें मुद्यापुरतेंच देऊन तृप्त झाला नाहीं, पण त्यानें आणखीहि मला सांगितलें कीं, तीन आठवडे होतील तेव्हां **दानआम्ब्रोशो** स्वर्गवासी झाला, आणि त्याच्या बायकोनें **बर्गास** एथील एका आश्रमांत राहून आपल्या आयुष्याचा सद्व्यय करावा, असा निश्चय केला आहे. ह्या आश्रमाचें नांवही त्यानें सांगितलें. हें ऐकतांच मी वाड्याचा रस्ता टाकून पाहिल्यानें जसें मनांत होतें, त्याप्रमाणें **बर्गास** शहराचा रस्ता धरला, आणि एकदम **दोनामेन्शाच्या** आश्रमास येऊन पोंचलों. बाहेर उभा राहून **आस्तोर्गा** एथील तुरुंगांतून नुकताच सुटून आलेला एक तरुण गृहस्थ बाईसाहेबांच्या भेटीस आला आहे, असी वर्दी देवडीवरील दासीची पायधरणी करून आंत लाविली. वर्दी लावून ती तसीच परत आली व मला एका माजघरांत बसण्याविषयीं सांगूं लागली. मी तसें केलें, तों **मार्किसाची** विधवा बायको सुतकीवेषानें तेथें आली.

ती बाई ह्मणाली:—'तूं कुशल आहेस कीं? चार दिवसांमागें **आस्तोर्गा** एथील एका गृहस्थाला पत्र

लिहून माझ्या तर्फेनें तुला भेटण्याविषयीं मी विनंती केली होती आणि तुझी सुटका होतांच तूं येऊन मला भेटावें, असेंही तुला सांगण्याविषयीं त्याला त्याच पत्रांत लिहिलें होतें. तुझी मोकळीकही लवकरच झाली असावी ह्यांत संशय नाहीं. तुझ्या निर्दोषी वर्तनाबद्दल फौजदाराला जें मी सांगितलें होतें, तें तुझी त्वरित सुटका होण्याला बस होतें. तिकडून मला उत्तर आलें. त्यांत तूं तुरुंगांतून सुटलास, पण कोठें गेलास तें कोणास ठाऊक नाहीं, असा मजकूर होता. तूं मला परत भेटतोस कीं नाहीं व तुझे उपकार स्मरण्याची संधि मला मिळते कीं नाहीं, ह्या काळजींत मी होतीं. ह्याप्रमाणें तिचें भाषण चाललें असतां मी माझ्या घाणेरड्या पोशाखानें तिच्या समोर उभा होतों, ह्मणून मला फार लाज वाटे व गोंधळल्यासारखा होई, हें पाहून ती परत ह्मणाली:— ' कांहीं चिंता नाहीं. बेऱ्या पोशाखाची ती कथा काय? तूं माझ्या उपयोगी इतका पडला आहेस कीं, जर तुझ्या उपकाराचा मोबदला करण्यास मी धजलीं नाहीं, तर मजसारखी दुसरी चांडाळ बायको ह्या दुनियेंत सांपडणार नाहीं. यासाठीं तुझी दगदग घालविण्याचें काम मी पत्करतीं. हें माझें कर्तव्यकर्म असून त्याचीं साधनेंही माझ्या शक्तींत आहेत. स्वतःला कोणत्याच प्रकारें असोईंत न पडतां तुझ्या उपकाराचें कर्ज फेडण्याला हरकत पडणार नाहीं, इतकी माझी संपदा आहे.'

ती पुढें ह्मणाली;—'आस्तोर्गा एथें आह्मी उभय·

तांही चौकींत पडलों, तेथपर्यंत माझी हकीकत तुला माहीत झालीच आहे. नंतर मला काय काय घडलें तें आतां मी तुला सांगतों. **आस्तोर्गाच्या** फौजदाराला मी आपली इत्थंभूत कथा सांगितल्याबरोबर त्याची खात्री होऊन त्यानें मला **बर्गास** येथें रवाना केलें. तदनंतर मी **मार्किसाच्या** वाड्यांत हजर झालों. मी आपल्या परत येण्यानें सर्वांला मोठ्या आश्चर्यांत टाकिलें. लोकांकडून मला असें समजलें कीं, आपल्या घरांतून मी एकाएकीं पळून गेल्यामुळें **मार्किसाच्या** हृदयास जबरदस्त धक्का पोंचला व तो आतां इतका आजारी आहे कीं चांगले प्रसिद्ध वैद्यही त्याच्या जीविताची आस्था बाळगीत नाहींत, यासाठीं माझें येणें फार उशिरां झालें; माझ्या दैवगतीच्या शोक-रसास हा एक नूतन प्रकार जोडला गेला. तथापि मी आलों, ह्याबद्दल **मार्किसाकडे** वर्दी पोंचविली. आज्ञा मिळतांच मी **मार्किसाच्या** खोलींत गेलों व त्याच्या पलंगासमोर गुडघे टेकून बसलों; ह्या वेळीं माझें तोंड दुःखाश्रूंनीं व्यापून गेलें होतें व माझें अंतःकरण खऱ्याखुऱ्याच दुःखाच्या अतिशयानें अत्यंत गांजून गेलें होतें. मला पहातांच **मार्किस** ह्मणाला;—'तुला एथें कोणी बलावून आणलें? तूं आपला कोणताही मतलब साधून घेण्याच्या विचारानें इकडे आली आहेस काय? त्वां माझा जीव घेतला, इतक्यानेंच संतुष्ट झाली नाहींस काय? माझें प्राणोत्क्रमण कसें होतें, तें आपल्या डोळ्यांनीं प्रत्यक्ष पहावें असी अंतः

करणापासून तुझी इच्छा असून ती तृप्त करण्यासाठीं तूं आली आहेस असें वाटतें.' मी उत्तर केलें;- माझ्या धन्या, मी आपल्या प्रथम पतीबराबर पळून गेली त्याबद्दल सर्व कथा इनेसीनें आपल्याला श्रुत केली असावीच; आणि दुर्दैवानें घाला घालून तो सर्वस्वी माझ्याकडून हिरावून नेला नसता तर मी अतःपर आपल्या दृष्टीस पडलीं नसतीं.' ह्याच वेळीं दानअल्वारोला वाटमाऱ्या चोरांनीं मारलें व त्यांनीं मला आपल्या भुयारांत बंदीवान करून ठेविलें होतें, पण मोठ्या नसीबानें माझी सुटका झाली, इत्यादि सर्व गोष्टी मुळापासून शेवटापर्यंत मी त्याला कळविल्या. हें ऐकून त्याला दया आली व त्यानें आपला उदार हस्त पुढें केला, व प्रीतिपुरस्सर असें ह्मटलें कीं; 'बस, माझी खातरी झाली; आतां मला कसलेच गाऱ्हाणें सांगण्यास जागा उरली नाहीं. अरेरे! तुला दोष देण्यासारखा मला कोणता तरी हक्क आहे काय? आपल्या प्रियपतीच्या पंथांत तूं परत गेलीस, ह्मणून त्वां मला अशा दुःखांत सोडलें. ह्या तुझ्या अप्रतिम प्रीतीसाठीं तुला मी कसा छळूं शकेन? हे देवी, तूंच पहा बरें! देवाच्या इच्छेस कोणाच्यानेंही अडथळा आणवत नाहीं. ह्यासाठींच मी तुझा पाठलाग करूं नये असा हुकूम दिला. दानअल्वार जरी माझा प्रतिस्पर्धी होता, तरी त्याला जे पवित्र व आद्य अधिकार प्राप्त झाले होते, त्यांला मान दिल्यावांचून माझ्यानें रहावलें नाहीं; आणि त्याजबराबर पळून जाण्यासाठीं

तुला जी प्रेरणा झाली, तीही कोणत्या तरी श्रेष्ठ शक्तीपासून झाली असें मी समजलों. ह्या सर्वांचा निकाल न्यायदृष्टीनें व समसुतीच्या भावनेनें करणें ह्मटलें ह्मणजे, तूं पुनः पूर्ववत्प्रमाणें माझ्या प्रीतीस पात्र झालें पाहिजे. प्रिये मन्शा, तूं आलीस येणेंकरून खरोखर मी आनंदसागरांत बुडून गेलों आहें. पण कटकटा! हें आनंदसुख अनुभविण्यास मी फार काळ राहीन असें वाटत नाहीं. मला आपला अंतकाळ समीप आला असा भास होतो. तुझें माझें पुरतें पुनर्दर्शन घडलें नाहीं, तोंच मला तुझा शेवटचा निरोप घ्यावा लागतो ह्यांत संशय नाहीं.' ह्या अंतःकरणवेधक शब्दांनीं माझ्या नेत्रावाटे अश्रूंचे लोट चालले. मानवी अंतःकरणांत जितक्या दुःखाचा समावेश व्हावा, तितकें दुःख मला झालें व तें आपोआप बाहेर पडलें. दानअल्बारावर जरी मी इतकी आसक्त होतीं, तरी त्याच्या मरणानें मला इतकें प्रखर दुःख झालें असें वाटत नाहीं. दानआम्ब्रोशोनें आपल्या मृत्यूबद्दल जें भविष्य केलें, तें खरें उतरलें; दुसऱ्याच दिवशीं तो देवाज्ञा पावला. आतां आमच्या लग्नाच्या वेळीं ठराव झाल्याप्रमाणें मला बरेंच भर्तृदत्त धन राहिलें आहे. पण त्याचा असद्व्यय होऊं नये, ह्मणून मी फार जपेन. मी जरी अजून तारुण्यांत आहे, तरी तिसऱ्या पतीच्या बेगेंत जाईन, असें आतां कोणींच समजूं नये. दुसरें असें आहे कीं, असा छिछोरपणा जी निर्लज्ज व फंदी बायको असती, तिच्याच अंतःकरणाला जाचक होत नाहीं; सत्वधीर

व सुजाण बायकोच्या मनाशीं तशा हलकटपणाचा मुळींच मिलाफ होणार नाहीं. विषयसुखाची रुचि मजमधून निखालस विझाली, असें मी उघड कबूल करीन; यासाठीं आपल्या आयुष्याचे दिवस ह्या आश्रमांत घालवावे व ह्या आश्रमाची पाळणकर्त्री व्हावें, असी माझी इच्छा आहे.

ह्याप्रमाणें दोनामेन्शा इनें आपल्या पुढील बेता बद्दल भाषण केलें. नंतर तिनें आपल्या झग्यांतून एक थैली बाहेर काढली आणि माझ्या हातीं दिली. ती ह्मणाली:—'हे शंभर ड्युकत फक्त तुला कपडे लत्त करण्यासाठीं घे. हें झालें, ह्मणजे परत येऊन मला भेट. मी आपली कृतज्ञता अशा स्वल्प मर्यादेंत कोंडून ठेवूं इच्छीत नाहीं.' मी तिचे फारफार आभार मानले व तिला तुझा निरोप घेतल्यावांचून बर्गास सोडून जाणार नाहीं, असें शपथपूर्वक वचन दिलें. अशा वचनाचा अनादर कोण तरी पापी करील! माझे तर पंचहीप्राण त्याचें पालन करण्याकडे गुंतून पडले! नंतर मी एकाद्या मेजवानीच्या घराचा शोध लावावा ह्मणून गेलों. पहिल्यानेंच जें घर सांपडलें तेथें उतरून जागा मागितली. माझ्या झग्यामुळें माझ्या खर्चाबद्दल वाईट मत होऊं नये ह्मणून मी पूर्वींच घरधन्याला सांगितलें कीं, जरी बाह्मात्कारीं मी दर्शनसंतोषी दिसत नाहीं, तरी मी आपल्या एक रात्र राहाण्या बद्दल पैसे एकाद्या डौलदार पोशाखल्यालेल्या गृहस्थाप्रमाणें चुकवीन. घरधन्याचें नांव माजूलो असें होतें.

हा बडा थट्टेबाज होता. माझें बोलणें ऐकतांच तो माझ्या पायांपासून डोकीपर्यंत आपली दृष्टि फिरवीत मजकडे धांवला व समाधानपणें आणि उपरोधिक मुद्रेनें दांत विचकल्यासारखें करून ह्मणाला;—'अशा प्रकारें खातरी करण्याचें आपल्याला कांहीं प्रयोजन नव्हतें; आपण उदारपणानें माझी सेवा फेडाल, हें स्पष्ट दिसतें, कारण आपली मुद्राच श्रीमंतीची दिसते. कांहीं कारणपरत्वें आपण हा वेष धारण केला असेल; द्रव्यसंबंधानें आपलें चांगलें स्वास्थ्य असावें, ह्यांत संशय नाहीं. तो लुच्चा मजकडे पाहून हंसत होता, असें मला स्पष्ट दिसलें; यासाठीं हंशाचें पेटके भरण्यापूर्वींच त्याची उचल थांबवावी ह्मणून मी आपल्या थैलीची थोडीसी चुणूक त्याला दिली. त्याच्या समोरच एक मेज होतें, त्यावर थैलींतले द्रुकत ओतून मी मोजूं लागलों, व बारीक दृष्टीनें पाहिलें, तों माझ्या नाण्याच्या योगें तो अदबीवर येत चालल्याचीं लक्षणें दिसूं लागलीं. मी त्याला एका शिंप्याला बलावून आणण्याला सांगितलें. तो ह्मणाला कीं,—'दलालासच बलावलें तर चांगलें; तो सर्व प्रकारचे पोशाखी कपडे आणील; व तुह्मांला हवे ते कपडे एकाच खेपेंत मिळतील. मीं ही सूचना मान्य केली व तीच प्रचारांत आणावी असा निश्चय केला. दिवस अस्तमानास जात होता, ह्मणून मी आपली खरेदी दुसऱ्या सकाळ पर्यंत तकूब ठेविली आणि रान सोडून पळाल्यापासून जो माझा उपासमार झाला होता, त्याचा वचपा

काढावा, ह्मणून अगोदर भोजनाच्या तर्तुदीस लागावें, असे मनांत आणलें.

---

## भाग १५.

**जिल्ब्लास** दबदार पोशाख करतो, व त्या बाईकडून दुसरें बक्षीस घेतो. **बर्गास** सोडून जातांना त्याचा लवाजिमा.

त्यानीं मेंढ्याच्या मांसाचा खिमा एका ताटांत विपुळ भरून मजपुढें ठेविला. बहुधा त्या अवघ्या पक्कान्नाचा मीं चेंदा उडविला; प्राशनही भोजनाच्या तोडीस आणलें. आणि जेव्हां कोथळींत अवकाश नाहींसा झाला, तेव्हां बिछान्यावर जाऊन पडलों. भरपूर खाऊन पिऊन सुखाने पडलों होतों, तेव्हां विलंब न लागतां गात्रांस शिथिलपणा पोंचून गाढ झोप लागेल, असी मला आशा होती; पण पापी डोळा कांहीं केल्या झांकेना. दुसऱ्या सकाळीं पोशाख खरीद करावयाचा होता, तो कसा निवडावा, ह्या विवंचनेत मन गुतून पडलें. बरें आतां कसें करावें ? मी माझ्या पहिल्याच बेताला अनुसरू काय ? एकादा तोकडा झगा विकत घेऊन शिक्षकीचा धंदा चालविण्यासाठीं **सालामांकास** जाऊं काय ! पण अशा सनदी शिक्षकांचा पोशाख मी कां विकत घ्यावा ? परंपरा चालविण्यासाठीं ? बरें, माझी मनदेवता तरी आंतून काय सांगते तें पाहूं. नाहीं;

ती असें कांहीं करूं नको ह्मणून सांगते. मलवस्त्राहून तरवार वापरावी, व दुसऱ्या गोष्टीच्या विचारांत पडण्यापूर्वीं ह्या जगांत शूरांप्रमाणें बाहुबळावर जावें हें बरें, इत्यादि विचार माझ्या मनांत घोळूं लागले.

गृहस्थी वाण्याचा पोशाख करावा, असा मी निश्चय केला. रात्र संपून सूर्योदय केव्हां होईल त्याची वाट पाहत पडलों; आणि थोडासा प्रकाश माझ्या डोळ्यावरून झळकला न झळकला इतक्यांत उठून बसलों. उठतांच मी त्या घरांत इतक्या मोठ्यानें गोंगाट केला कीं, पटाईत निजणारे सुद्धां जागे झाले. मी सगळ्या चाकरांला हाका मारल्या व त्यानीं शिव्यांच्या वर्षावानें मला जबाब दिले. पण करतात काय ? त्यांना आंथरूण सोडून उठणें भागच पडलें. मी कुठला त्यांनां निजूं द्यायाला ? ते दलालास बलावून आणीत तों माझ्यानें फुरसद काढवेना. दलाल लवकरच आला; त्याजबराबर दोन छोकरे हिरव्या कपड्यांचा एक एक मोठा बोजा खांद्यावर लटकावून आले. ह्या दलालानें पुढें लिहिल्या प्रमाणें मोठ्या अदबानें मजशीं भाषण केलें:—'रावसाहेब, दुसऱ्या कोणाकडे आपली शिफारस न होतां मजकडेच झाली, येणेंकरून आपण आपला फायदा करून घेतला ह्यांत संशय नाहीं. मी आपल्या भाऊबंदांची निंदा करतों असें आपण समजूं नये; त्यांच्या अब्रूला यत्किंचितही डाग लावण्याचें ईश्वरानें माझ्या हातून घडवूं नये. ते सर्व प्रकारें चांगलेच आहेत. पण सांगणें ह्मणून इतकेंच कीं, आमच्यांत

एकही असा सांपडणार नाहीं, कीं तो पोटतिडि-कीनें आपल्या धन्याचे काम बजावील. एकाद्याला उलटा सुलटा सोलून टाकण्याच्या कामीं हे जू लोकाला ही मागें पाडतात; प्रामाणिकपणा कसा असतो, हे एकालाहि माहीत नाहीं. अवघ्या ओसाड वाळवंटांत ओलाव्याचें हिरवें स्थळ काय तें मीच आहें. मी वाजवी तेवढा नफा घेऊन संतुष्ट राहतों. एका पेनी मागे मला एक पौंड सुटला तर बस; छे! छे! मी उलटें बोललों:— एका पौंडामागें एक पेनी;—असे बोलावेसे माझ्या मनांत होतें. परमेश्वरा! मला तूं ह्या जगांत असेच प्रामाणिकपणें व सुखानें चालण्याची बुद्धि सर्वदा दे!

ह्या दलालाचा प्रस्ताव म्या मूर्खानें अक्षरशः खरा मानला व त्या छोकऱ्यांला आपले बोजे सोडण्यास सांगितलें. त्यांनीं इंद्रधनुष्यांतील प्रत्येक रंगाचे पोशाख मला दाखविले व नानाप्रकारचे दुसरे सुटे कपडेही विकायाला बाहेर काढले. हे सर्व कपडे बेताबाहेरसे वाटल्यावरून मी झिटकारले; पण त्यांनीं मला एक पोशाख आंगास चढवून पाहण्याविषयीं सांगितल्यावरून मी तसें केलें, तो जसा काय तो माझ्या आंगाचे माप घेऊनच तयार केला होता, असा बसला. ह्या साजाकडे माझी हौस धांवली. रोज वापरण्याच्या कामाला जरी तो अमळ भारी होता, तरी त्याकडे माझा जीव टांगल्यासारखा होऊन मी किंमत ठरविण्यासाठीं झटलों. सर्व साजाचासाज निळ्या रंगाच्या मखमालीचा केला होता व त्यावर सोनेरी कलाबतूच्या

कशिदेदार बुट्ट्या होत्या. त्या दलालानें माझा कल जाणून म्हटलें कीं; 'आपल्याला वस्तूची चांगली पारख आहे. मी ईश्वरास स्मरून खरें तें सांगतों कीं, आपण कांहीं आज कालच्या नव्या उमेदवारांसारखे दिसत नाहीं, हें स्पष्ट आहे. हा एवढा साज तर तुम्ही ठेवा ! एका पहिल्या प्रतीच्या बड्या गृहस्थासाठीं हा पोशाख तयार केला होता व तो कालच तयार होऊन आज बाहेर पडला आहे. मखमाल तरी कशी आहे ती पाहा ! हात लावून बघा: इतकी उंची खुमासदार व मासलेदार सुंदर रंगाची दुसरी मखमाल कोठेंही मिळणार नाहीं; आणि कशिदा कसा आहे ! त्यांत जी कारागिरी आहे, त्याहून चांगली कारागिरी आपण कोठें पाहिली असल, तर सांगा पाहूं !' मी त्याची किंमत विचारली, तेव्हां त्यानें उत्तर केलें;—'किंमत फारसी नाहीं; अवघे साठ डुकत. खोटें बोलेल तो कमअस्सल. कालच एक गिऱ्हाईक इतकी किंमत देऊन तो साज घेण्यासाठीं अगदीं हटीं पडला होता, पण त्यां दिला नाहीं. आपण नवें गिऱ्हाईक पडलां व मागें पुढें दुसरें पुष्कळ काम आपल्याकडून मला फर्माविलें जाईल; शिवाय आपण उत्तम परीक्षक आहां, तेव्हां व्यर्थ जीभ लांब केली, तर उलटी लबाडी पदरांत बांधावी लागेल, म्हणून तितक्या किमतीला मी तो पोशाख देण्यास कबूल झालों.' मी पहिल्यानेंच पन्नेचाळीस डुकत देऊं केले. सांगितलेल्या व देऊं केलेल्या किमतींत फरक थोडाच होता! अधिक तर

पंचवीस बुकत किंमत रास्त होती. त्या दलालानें सावधानपणें असें ह्मटलें कीं; "धनीमहाराज! मी अधिक मागत नाहीं. आपल्यासारख्या प्रतिष्ठित गृहस्थासमोर मी एकच किंमत सांगत असतों. (नंतर तो पोशाख एकीकडे काढून दुसरा पोशाख उचलतो.) पण इकडे बघा, हा साज आपल्याला पुरवत नसेल, तर हा दुसरा घ्या; पहिल्यापेक्षां हा दुसरा तुह्मांला सरफिवार पडेल.' ह्या सर्व प्रकारांनीं, ज्या वस्तूची किंमत कमी करायाला मी पाहीं, तीच वस्तू कसेंही करून हाताबाहेर घालवूं नये, असी मला उत्कंठा झाली. आणि त्यानें किंमत कमी केली असती, असें जरी होतें, तरी त्याबद्दल मला कल्पना न झाल्यामुळें मी साठ बुकत त्याला दिले. जेव्हां मूर्ख व त्याचा पैसा हे सहज रीतीनें परस्परांला अंतरले, असें त्यानें पाहिलें, तेव्हां, मला खरोखरच वाटतें कीं, नीतिज्ञान एकीकडे ठेवून हपाप घेणाऱ्या जू लोकांकडून एकादी उपदेशपर सूचना घेतली असती, तर बरें होतें, असा त्याला पश्चात्ताप झाला असेल. कारण माझ्या तोंडाला आणखीही पानें पुसण्यास त्याला सवड होतीच, पण वाजवी तेवढा नफा घेण्याचा त्याचा बाणा, त्याप्रमाणें एका पेनीमागें जो एक पौंड मिळाला, तितक्यांतच संतुष्ट होऊन तो आपल्या गड्यांसहित चालताझाला. तेही सकाळपासून संध्याकाळपर्यंत श्रम करीत फिरतात व त्यानांही पोट आहे, असी मी आपल्या मनाची समजूत केली.

आतां एक बंडी, एक घोंगडी आणि दोन चांगले मांडचोळणे इतकीं वस्त्रें मजकडे झालीं. माझ्या पोशाखाचा दुसरा सरंजाम अजून घ्यायाचाच होता: अर्धा दिवस तर या खालीं मोडला. मी तागाचा कांहीं बारीक कपडा, एक टोपी, रेशमी पायमोजे, बुटांची जोडी, आणि एक तरवार इतकें साहित्य विकत घेऊन खरेदी पुरी केली. हा सगळा पोशाख चढविला, आणि आपल्या सज्ज शरीराचा जेवढा भाग दिसला, तेवढा नीट न्याहाळून पाहिला; तेव्हां माझ्या डोळ्यांला किती तरी आनंद झाला! त्या पोशाखाच्या भरकुमीकडे माझे डोळे एकसारखे लागून गेले. मोर जसा आपल्या सुंदर पिसाऱ्याकडे वरचेवर पाहतो, तसा मी आपल्या पोशाखाकडे पाहूं लागलों. ह्याच दिवशीं मी दोनामेन्शाला परत भेटलों. तिनेंही आपल्या राजच्या भलाईनें माझी भेट घेतली. वी, मी तिच्या मोठ्या उपयोगावर पडलों होतों, ह्मणून वारवार माझे आभार मानूं लागली. ह्या विषयावर परस्परांनीं परस्परांचा बराच वेळ आदरमान केला. नंतर 'प्रत्येक गोष्टींत ईश्वर तुला यश देवो.' असा आशीर्वाद देऊन व मला रामराम करून ती चालती झाली. जातांनां सुमारें तीस पिस्तोल किमतीची एक आंगठी मात्र मला नजर करून बोलली कीं, 'कृपा करून माझ्या स्मरणासाठीं ही आंगठी तूं ठेव.'

मी आपल्या मतें ती कांहीं तरी मोठेंसें बक्षीस देईल असें मानलें होतें, ह्मणून ती आंगठीच मिळा-

त्यासरशी मी अगदीं बावळा झालों. त्या बाईच्या ह्या इवल्याशा औदार्यानें मुळींच संतुष्ट न होतां, मी विवेचना करीत करीत पावलें मागें मोजूं लागलों; पण आपल्या खाणावळीच्या दरवाजाशीं येऊन ठेपलों न ठेपलों इतक्यांत एका माणसानें मला गांठलें व आपल्या घोंगडींतून एक मोठी पिशवी बाहेर काढून मजसमोर ठेविली. ही पिशवी बहुधा चालू नाण्यानें पूर्ण भरलेली होती असें दिसलें; मी आणि तेथें जे दुसरे होते, ते तोंड वासून तिजकडे पाहूं लागलों. मृत्तिका मळापासून उत्पन्न झालेल्या ह्या ओझेवाल्याचे शब्द जसे मला अमृतप्राय गोड लागले, तसे प्रत्यक्ष स्वर्लोकवासी देवदूतांचेही शब्द गोड लागले नसते. तो ह्मणाला;—'जिल्ब्लास महाराज, मार्किसबाईनें आपल्याला रामराम सांगितले आहेत.' मी डोकें हालविल्यासारखें करून मान्यता दर्शविली व चांगचांगल्या भाषणांनीं त्याला खुष करून घरीं जाण्यासाठीं निरोप दिला. मजकडे त्याची पाठ झाली, इतक्यांत ससाणा जसा आपल्या भक्ष्यावर झडप घालतो, तशी झडप मी त्या थैलीवर घातली व तिला आपल्या गर्वांत धरून खोलींत गेलों. मी एका क्षणाचाही विलंब न लावितां ती पिशवी सोडली; आंत एकहजार ड्युकत होते! घरधन्यानें त्या ओझ्याचे शब्द कानोसा घेऊन ऐकिले होतेच, त्यावरून मी ते ड्युकत मोजीत होतों, इतक्यांत तो आंत आला. मेजावर तें सगळें द्रव्य पडलेलें पाहून त्याची चंद्री गुंग झाली; व तो

ह्मणाला;–‘ अरे ! काय तरी चमत्कार हा ! असें हें द्रव्य !’ नंतर वांकड्या डोळ्यानें गमजे करीत करीत पुढें आला आणि ह्मणतो; ‘ बरें ! बरें ! तुह्मी पक्के वस्ताद आहां बुवा ! नायकांच्या मनोरथाला कशा कशा गुदगुल्या कराव्या, तें तुह्मी चांगलें जाणतां ! तुह्मांला **वर्गासाला** येऊन परते चोवीस तासही झाले नाहींत, तोंच पहिल्याच भेटीसरसें **मार्किस** बाईला तुह्मीं आपल्या कहेत आणलें.’

हें भाषण कांहीं ह्मणण्यासारखें खराब नव्हतें. **मातूलोचा** समज जरी चुकीचा होता, तरी त्यानें माझ्या फुशारकीची तारीफ केली, तेव्हां त्याची चूक त्याला उघडी करून द्यावी, असा पुरतेपणीं माझ्या मनाचा कल झाला नाहीं. जवान जवान पोरगे, दुस. ऱ्यांनीं आपल्याला इष्कबाजमर्द ह्मणावें असें इच्छितात, ह्यांत कांहीं नवल नाहीं. परंतु अद्याप मी कडकडीत ब्रह्मचारी होतों, व माझें शुद्धाचरण कोणत्याही गर्वोक्तीपासून मला राखीत असे. मी धरधन्याला **दानामेन्शाची** इत्थंभूत कथा सांगून त्याचा संशय दूर केला. माझें वृत्त त्यानें लक्ष लावून ऐकिलें. नंतर मी आपली कुळकथा त्याला सांगितली, ती ऐकत असतां त्याला गोडी लागलीसी दिसल्यावरून मला दोन उपदेशपर शब्द सांगून सहाय व्हावें असी मी त्याला विनंती केली. त्यानें कांहीं वेळपर्यंत एकाग्रचित्त होऊन गंभीर मुद्रेनें म्हटलें; ‘ **जिल्ब्लाससाहेब,** आतां तुह्मांवर माझी प्रीति जडली; आणि ज्या अर्थी

उघड्या अंतःकरणानें तुह्मीं मला आपला वृत्तांत कळविला व माझा उपदेश विचारला, त्या अर्थी मीही कांहींएक पडदा न ठेवितां कोणत्या प्रकारानें तुमचें चांगलें होईल, तें तुह्मांला सांगतों. तुह्मीं दरबार मुत्सद्दगिरीच्या कामाला योग्य आहां, असें तुमच्या लक्षणांवरूनच स्पष्ट दिसतें; यासाठीं तेथपर्यंत तुह्मीं जा आणि एकाद्या बड्या मानकऱ्याशीं वळण पाडा व त्याच्या चाकरीस राहा. त्याची मर्जी कोणत्या प्रकारें राखावी व त्याच्या गुप्त मसलती कशा समजून घ्याव्या, ह्या गोष्टीकडे मात्र चांगलें लक्ष ठेवा; तुह्मीं असें न कराल तर त्याच्या कुटुंबांत राहून व्यर्थ कालक्षेप केल्यासारखा मात्र होईल. ते लोक एकाद्या खऱ्या मित्राची निष्ठा किंवा पोटाग हीं गणीत नाहींत. त्यांनां भडवे, खुशामती, टाळीस टाळी देणारे माणूस पाहिजेत, याशिवाय दुसरेही एक साधन तुह्मांकडे आहे: तुह्मीं तरुण व देखणे आहां. तुमच्या दुसऱ्या चांगल्या गुणांला विचारतो जवरा! त्यांची क्वचित गरज लागली तर लागती. एखाद्या श्रीमान विधवा अथवा सधवा बायकोची उठावणी तुमच्या कडून झाली नाहीं, तर तुह्मीं जन्माला येऊन व्यर्थ! स्त्रीव्यसनानें श्रीमान लोक कदाचित् फशीं पडतील, पण ज्याच्या काखा मुळींच बरख्या, त्यानां त्यापासून उलटा फायदा होण्याचा संभव आहे. यासाठीं माझें तर मत तुह्मीं आमदिहास जावें असें आहे; पण कांहीं तरी लवाजिमा घेतल्या शिवाय तुह्मांस तिकडे जातां नये. तेथें काय

व दुसरीकडे काय! लोक शरीरंगाला विचारतात आणि तुम्ही जसा भपका ठेवाल, तसे ते तुम्हांला विचारतील. तुम्हांसाठीं मी एक चाकर आणीन: उगीच नव्हे, कसोटीस लावलेला चाकर, हुशार व नामी पोरगा, माझ्या खातरीस उतरलेला व माझ्याच स्वभावाचा असा गडी आहे. आपल्या साठीं एक व चाकरासाठीं एक असे दोन खेचर विकत घ्या आणि जितक्या त्वरेनें जावेल तितके जा.'

हा उपदेश इतका पसंत दिसला कीं, माझ्यानें त्याचा अव्हेर करवेना. दुसऱ्या दिवशीं मी दोन खेचर विकत घेतले आणि चाकराच्या बोलीचाली बद्दल ठराव केला. तो तीस वर्षांचा तरुण मनुष्य होता; दिसण्यांत साबडा व भोळसरसा दिसे. आपण गालिशाचा रहाणारा, व आपलें नांव आंब्रोस असें त्यानें मला सांगितलें. दुसरे चाकर आपलपोटे असतात व आपल्याला पुरती मजुरीच पोंचत नसते, असी नेहेमी कुरकूर करतात. हा चाकर तसा नव्हता: त्यानें माझी खातरी केली कीं, आपण फारशा भुकेचा माणूस नाहीं, आणि मी नें कांहीं देईन त्यांतच संतुष्ट रहाणारा आहे. नंतर मी एक जामदानी विकत घेतली व घरधन्याचा निरोप घेऊन आम्हीं दुसऱ्या सकाळीं सूर्योदयाच्या पूर्वीं बर्गास सोडून माद्रिदाच्या रस्त्यास लागलों.



## भाग १६.

### एकाद्या मनुष्याच्या हातांतून लक्ष्मी कशी निसटून जाते ती पहा.

पहिल्या रात्रीं आह्मीं **कूनास** एथें निजलों, आणि दुसऱ्या दिवशीं सुमारें संध्याकाळच्या चार वाजतां **वालादोलिदास** पोंचलों. सर्व शहरांत जो चांगला संभावितसा भटारखाना दिसला, तेथें उतरलों. खेचरांला गड्याच्या स्वाधीन केलें, आणि मी एका खोलींत जाऊन हुजऱ्याकडून माझी जामदानी आंत आणविली. मी थोडासा थकलों होतों, ह्मणून तसाच पायांतील बुटांसहित एका कोचीवर आडई घेतली, तों एकाएकीं झोंपीं गेलों. मी उठलों तेव्हां बरीच रात्र पडली होती. मी **आम्ब्रोसाला** हाक मारिली. तो घरांत कोठें मिळेना; पण थोड्याच वेळानें आला. तूं कोठें गेला होतास? असें मी त्याला विचारलें. त्यानें मला सांगितलें कीं, **बर्गासा** पासून **वालादोलिदा**पर्यंत परमेश्वरानें आपल्याला सुरक्षितपणें आणलें, त्याबद्दल कृतज्ञतापूर्वक त्या परमेश्वराची स्तुति करण्यासाठीं आपण देवळांत गेलों होतों. मी त्याच्या भक्तीची तारीफ केली; नंतर रात्री भोजनासाठीं कोंबडीचें मांस तयार करावें, अशी वर्दी दिली.

ही वर्दी देत आहें, इतक्यांत घरधनी हातांत पेटलेली मेणबत्ती घेऊन माझ्या खोलींत आला. त्या शापदग्ध मेणबत्तीच्या उजेडानें एक बाईही आंत

प्रविष्ट झाली. ही बाई सुंदर पण तरुण नव्हती, आणि उंच पोशाख ल्याली होती. ती एका भालदारावर ओटांगली होती व तिच्या स्वारींत एक शिद्याचा छोकरा होता. ह्या गुप्तवेषी बाईनें गंभीरपणें नमन करून मला विचारलें कीं;–'संतिलनकर जिल्ब्लास महाराज,' हेंच का आपलें नांव?' हा प्रश्न ऐकतांच मी परम आश्चर्यांत पडलों व झट्कन माझ्या तोंडावाटे 'होय,' असे शब्द निघाल्या सारखे झाले, तोंच तिनें आपले मृदु हात त्या भालदाराच्या कबजांतून सोडविले आणि मोठ्या आनंदाच्या भरानें मला मिठी मारली. ह्याचा अर्थ काय तो उमगून काढण्यासाठीं मी जों जों अधिकाधिक विचार करूं लागलों, तों तों माझी अक्कल गुग होऊं लागली. ती ह्मणाली;–"देवानें जी आज मजवर दया केली, तिजकरितां मी त्याचा स्तव करितें. मी ज्या सत्पुरुषाच्या शोधांत होतें, तो तूंच आहेस. ह्या उपोद्घातावरून मला पिनेफ्लोर एथील माझा मित्र उंडीकबाल ह्याची आठवण झाली, आणि ही बाई कांहीं प्रमाणिक नसावी असा संशय माझ्या मनांत येऊं लागला, पण तिच्या भाषणाच्या शोबटील रंगानें तिजविषयीं माझें मत बरें झालें. ती पुनः ह्मणाली, 'तूं मोठ्या शूरत्वानें व थोर हृदयानें जिचा बचाव केला, त्या दोनामेन्शाची वडील आतेबहीण मी लागतें. आज सकाळींच तिजकडून मला एक पत्र आलें. तुह्मीं माद्रिदास जाणार असें वर्तमान तिला लागल्यावरून ह्या रस्त्यानें तुमचें जाणें झालें,

तर मी तुमची चांगली बरदास्त ठेवावी, असा निरोप तिनें मला लिहिला आहे. हे दोन तास मी तुमच्या शोधार्थ सर्व शहरभर हिंडत आहें. ह्या भटारखान्याकडे जा, त्या भटारखान्याकडे जा, एथें चौकशी कर, तेथें चौकशी कर, ह्याप्रमाणें केलें; शेवटीं ह्या घरधन्यानें तुमच्या ज्या खाणाखुणा सांगितल्या, त्यांवरून माझ्या आतेबहिणीचे उद्धर्ते तुम्हींच असाल, असा तर्क मी केला. हा माझा तर्क खरा झाला, ह्मणून मी ईश्वराचा स्तव करतों. आतां मी आपल्या नातलगांच्या मित्राचा व तशांतही विशेषेंकरून माझ्या प्रियकर बहिणीच्या उद्धर्याचा आदर सत्कार कसा करितों, तें तुह्माला परिचयांतीं समजेल. कृपा करून तुह्मी आतां माझ्या घरीं चलावें. तेथें तुमची सोई एथल्याहून चांगली राहील. मी तिचे आभार मानले व उगीच परक्याला त्रास देण्यास आपण खुषी नाहीं, असें तिला सांगितलें: पण तिच्या आग्रहापुढे माझी मर्यादशीलता कांहींच नाहींसी झाली. आह्मांला नेण्यासाठीं भटारखान्याच्या दरवाजाशीं गाडी तयार होतीच, तींत माझी जामदानी चांगल्या बंदोबस्तानें तिनें आपल्या समक्ष ठेवविली; कारण तिनें खरें तें सांगितलें कीं, वालादोलिद एथें बरेच हाताळ माणूस आहेत! सारांश मी त्यानां आपला देह त्या भटारखान्यांतून ओढूं दिला: मी, ती व तो ह्मातारा भालदार असीं गाडींत बसलों. बिचाऱ्या घरधन्याच्या आंगाचा अगदीं तिळपापड झाला असेल, कारण

आपल्या बिऱ्हाडीं माझ्या राहाण्यापासून त्याने जी दस्तुरी मिळवण्याचे मनांत आणलें होतें, तिला तो अगदींच मुकला.

आमची गाडी कांहींशा अंतरावर जाऊन थांबली. आम्हीं एका सुंदर वाड्याच्या दरवाजाशीं उतरलों, आणि जिना चढून एका सदरेत गेलों; एथे नाना प्रकारचे सामान मांडलें होतें व सुमारें वीस किंवा तीस मेणबत्तीचे दिवे पेटत होते. कित्येक चाकर लोक उभे होते, त्यास या बाईनें, **दानराफेल** आला कीं काय? असें विचारलें. त्यांनीं 'नाहीं' असें उत्तर दिलें. नंतर तिनें मला अनुलक्षून भाषण केलें तें असें;—'**जिलब्लास** साहेब माझा भाऊ एथून सुमारें तीन कोसांवरील एका खेड्यांत गेला आहे, तो परत केव्हां येईल, ह्मणून मी वाट पाहात आहें. तो घरीं आल्यावर आमचें कुटुंब ज्या सद्गृहस्थाचें इतकें ऋणी झालें आहे, त्याचे पाय आपल्या घरास लागले, हें पाहून त्याला कितीतरी सानंदाश्चर्य होईल'! हें सुंदर भाषण तिनें संपविलें नाहीं, तोंच आह्मीं थोडासा गलबा ऐकिला, व तो गलबा **दानराफेलाच्या** आगमनानें झाला, असें आह्मांला कळलें. ह्या नटव्यानें लागलाच आपल्या दर्शनाचा लाभ आह्मांला दिला. ह्याचा आकार बराच प्रवघवीत, व बाणा गृहस्थीसा दिसला. ती बाई त्याला ह्मणाली; 'बंधु, तूं परत आलास, हें पाहून मला अत्यानंद झाला; आतां **संतिलनकर जिलब्लास महाराजांचा** आदर

सत्कार करण्याच्या कामीं तूं मला मदत देशील. आमची बहीण दोनामेन्शा ह्या गृहस्थाची फार उपकारी झाली आहे, त्याकरितां ह्याचा सन्मान जितका आम्हीं ठेवूं तितका थोडा. इकडे हें पहा, तिजकडून मला नुकतेंच एक पत्र आलें आहे, तें तूं वाच. दानराफेलानें लखोटा उघडला व पुढें लिहिल्या प्रमाणें घडघडीतपणें ते पत्र वाचलें;—

" प्रियकर कामिला, संतिलनकर जिल्लास "
" महाराज, माझ्या अबरूचे उद्धर्ते व जिवाचे त्राते "
" हे नुकतेच दरबारास जाण्यासाठीं निघाले आहेत. "
" त्यांचें जाणें अलबत वालादोलिदांतून होईल. तुझें "
" व माझें एक कुटुंबाचें नातें व त्याहूनही अधिक "
" असी आह्मां उभयतांची अखंड मैत्री, ह्या दोन "
" गोष्टी मनांत आणून मी तुला सशपथ विनंती करतीं "
" कीं, त्वां त्यांचा चांगला आदर सत्कार करावा "
" आणि कांहीं काळपर्यंत त्याला आपल्या घरीं "
" ठेवून घ्यावें. ह्या माझ्या विनंतीकडे तूं लक्ष देशील "
" व तूं आणि माझा प्रिय बंधु दानराफेल माझ्या "
" उद्धर्त्यांचा योग्य आदर सत्कार कराल अशी मी "
" मोठी उमेद ठेवितीं. "

" बर्गास. "

"तुझी प्रियकर बहीण,"
"दोनामेन्शा."

दानराफेल परत परत त्या पत्राकडे दृष्टि फिरवीत लगला;—"काय ! आमची बहीण आपली अबरू व

जीव ह्यांकारितां ह्या सद्गृहस्थाच्या ऋणांत आहे काय! असें आहे तर, हे ईश्वरा, त्वां आज मला अलभ्यलाभ दिला ह्मणून मी तुझा स्तव करितों.' ह्या प्रमाणें भाषण करून तो मजकडे धांवत आला व आपल्या दोन्हीं हातांनीं मला घट्ट मुरडून परत ह्मणाला:— संतिलनकर जिल्ल्लास महाराजांच्या दर्शनानें आज मला किती तरी आनंद होत आहे बरें! तुमचा आदर सत्कार ठेवण्यासाठीं माझ्या मार्किस-बाई वहिणीला असें आग्रह पुरःसर लिहिण्याचें अगत्य नव्हतें; तुह्मी वालादोलिदांतून जाणार आहां, इतकींच अक्षरें तिनें आह्मांला लिहिलीं असतीं तरीं चालतें. बरें, झालें तें ठीक झालें, आतां आह्मी जिशीं असी अत्यंत प्रीति ठेवितों, तिजवर ज्यानें असे अपरिमित व बिनतोड उपकार केले आहेत, या तरुण गृहस्थाचा आदर सत्कार कसा ठेविला पाहिजे, हें मला व माझी बहीण कामिला हिला शिकलें पाहिजे असें नाहीं; आह्मी तें सर्व जाणतच आहों.' ह्या भाषणाचा मोबदला जितक्या गौरवानें माझ्यानें करवला तितका मी केला; नंतर कांहीं वेळापर्यंत दोहोंही पक्षांकडून अशाच तऱ्हेचे भाषणचमत्कार घडले व मधून मधून आह्मीं ह्यांनां नमनादि नखाजखीच्या हावभावांनीं अलंकृत केलें.

हे झाल्यावर आह्मीं दुसऱ्या एका खोलींत गेलों. एथें जेवणाचें मेज तयार करून ठेविलें होतें. तीं दोघें बहीणभावंडें व मी असे तिघे भोजनाला बसलों.

भोजन चालत असतांना त्यानीं हजारदां माझ्या गुणांचें अनुवादन केलें. माझ्या तोंडावाटे कोणताही शब्द निघाला आणि त्यानीं त्या शब्दाची तोंकणी केली नाहीं, असी गोष्टच घडली नाहीं! प्रत्येक पक्वान्नाचा समाचार घेतांना त्या दोघांनींही आपल्याकडून होईल तितकी तत्परता ठेवून मला गौरविलें, ही गोष्ट ध्यानांतून जाण्यासारखी नव्हती: दानराफेलाने प्रत्येक वेळीं दोनामेन्शाचे नांव घेऊन आपल्यासाठीं एक व मजसाठीं एक असीं दोन गलासे भरून तयारींत रहावें; आणि दोघानींही पैजेला पडल्यासारखे होऊन तीं उलथीं पाडावीं. ह्याप्रमाणें बराच वेळ आमचें द्वंद्वयुद्ध चाललें. आह्मांबराबर बसलेली कामिला संकेत पूर्वक मला डोळे मोडीत होती, असें मला दिसे, तेंही ह्या प्रसंगीं माझी हिंमत वाढण्याला कारण झालें. कदाचित् आपली सांकेतिक दृष्टि आपल्या भावाच्या ध्यानांत येईल, ह्मणून ती चाचपल्यासारखी होई, असेंही मी पाहिलें. ती बाई मजकडे बेधून गेली होती, असी माझी पक्की खातरी झाली; आणि वालादोलिद एथें थोडावेळ मुकाम झाला, तर ह्या नवीन शोधापासून मनमुराद करमणूक सांपडेल असी आस्था मी करूं लागलों. त्यानीं मला थोडे दिवस आपल्या सोबतीनें घालविण्यासाठीं विनंती केली व तिला रुकार द्यावा, असा मला मोह पडला, तो ह्याच आस्थेनें. मी थांबलों, हें पाहून त्यांनीं माझे आभार मानले. कामिलेची ही दडपलेली पण दृश्य

आनंदमुद्रा पाहून मी तिच्या डोळ्यांत पुरता भरलों आहे, असे मला वाटलें.

थोडे दिवस मुकाम करण्या विषयीं माझा बेत झाल्यावर दानराफेलानें मला आपल्या वाडींतील नरी घेऊन जाण्याची सूचना केली. ह्या स्थळाचें वर्णन जें त्यानें केलें त्यावरून तें शानदार असावें असें दिसलें व त्या ठिकाणीं करमणुकीचे जे जे प्रकार त्यानें योजून दाखविले, त्यांवरून आनंदाचा बाहार उडेल असें मी समजलो. एकाद्या वेळीं तुह्मांला शिकारीची हौस झाली तर शिकार करायाला सांपडेल, व दुसऱ्या वेळीं मासळी पागावी असें तुमच्या मनांत आलें तर तसेंही करण्या साठीं सोई होईल; शिवाय गमतीनें सहल करण्या साठीं फिरावें असें तुह्मांला वाटलें, तर सुंदर सुंदर वनें व बागा इत्यादि स्थळें आहेतच; दुसरें सोबतीला मंडळीही गुलजार मिळेल व वेळ केंव्हां निघून जाईल ते समजणार नाहीं, अशा प्रकारें त्यानें मोठा बडेजाव सांगितला. मी त्याच्या आमंत्रणाचा यथादरें स्वीकार केला; आणि दुसऱ्या दिवशीं त्या रम्यस्थळीं जावें असा आमचा निश्चय ठरला. हा शानदार बेत तोंडांत ठेवून आह्मी मेजावरून उठलों. दानराफेल आनंदसागरांत पोहूं लागला, असें दिसलें. तो ह्मणाला; 'जिलब्लास महाराज, आपण क्षणभर एथेंच राहावें, माझी बहीण आपल्या सोबतीला आहेच, मी बाहेर जाऊन तिकडील सर्व तर्तुदीची वर्दी देतों व आपल्या सोबतीला जीं मनुष्यें पाहिजेत, त्यांस आमं-

त्रणे पाठवितों.' इतके शब्द बोलून तो, आह्मीं ज्या खोलींत बसलों होतों, तेथून लागलाच बाहेर पडला. मी त्या बाईबराबर बातचित करूं लागलों. तिच्या भाषणांतील विषय व तिच्या सूचक नेत्रांचे कटाक्ष हे परस्परांला कांहीं अंतरले नाहींत. तिने माझा हात आपल्या हातांनीं धरून माझ्या आंगठीशीं खेळत खेळत ह्मटलें कीं, 'वः तुमच्या आंगठीचा हिरा तरी खूप तेजदार आहे, पण तो अगदीच लहान पडला. तुह्मांला रत्नाची पारख करतां येती काय? मी 'नाहीं' असे उत्तर केलें, त्यावर ती परत ह्मणाली; 'अरेरे! तुह्मीं रत्नपारखे असतां, तर ह्या माझ्या हिऱ्याचें मोल तरी मला कळलें असते.' इतकें बोलून तिनें आपल्या बोटांतील हिरा मला दाखविला व मी त्या हिऱ्याकडे पाहत असतां ती ह्मणाली,—'फिलिपैन बेटांत स्पानिश सरकारच्या बतीनें माझा मामा गवर्नर होता, त्याने ही आंगठी मला दिली वाल्लादोलिदांतील रत्नपारखे ह्या हिऱ्याची किंमत तीनशें पिस्तोल करितात ' मी ह्मटले कीं; 'होय, तो दगड तसाच सुंदर दिसतो खरा. निदान तितकी तरी त्याची किंमत अलबत असली पाहिजे.' ती बोलली:—'असे काय ! तर मग ह्या आंगठीवर तुमची भिस्त मोठी आहे असे दिसते काय फिकीर नाहीं; अदला बदली ही चोरी नव्हे.' हे शब्द तोंडांतल्या तोंडांतच होते इतक्यांत डोळ्याचें पातें हालण्या पूर्वी तिनें माझ्या बोटांतील आंगठी झट्कन् काढून घेतली, आणि आपली आंगठी माझ्या करांगुलींत घातली. अशा सभ्य

रीतीनें परस्पर फर्मास झाल्यावर कामिलेनें माझा हात दाबला आणि मनोविकारसूचक प्रेमळ दृष्टीनें मज-कडे एकसारखी टक लाविली; नंतर एकदम खेळमो-डल्या सारखें करून ती माझा निरोप घेऊन आड झाली. मला वाटतें कीं, आपल्या कडून अविवेकानें आपल्या कोमल मनोवृत्तींचा आव निघाला, तेणेंकरून तिचें धैर्य खचून आपल्या तोंडावरील काळिमा झाकण्यासाठीं ती आड झाली.

वस्तुत: स्त्रीसत्काराच्या कामीं मी अनभ्यस्त होतों. त्या मार्गांतच मी चाललों नव्हतों, असें ह्मटलें तरी चालेल! तथापि माझ्या सांप्रतच्या आश्रमानें माझा इतका कडेलोट केला कीं, डोळ्यांसमोर दि-सणारी ही सर्व देखत भूल मी खरीच मानली. अर्थात् खेड्यापाड्यांतलि फेर फटका ह्या गोष्टीनें रम्य होईल असें मला वाटलें. ह्या मनोराज्यांत निमग्न आणि आपल्या कारभाराच्या भावी उत्कर्षानें उन्मत्त होत्सा-ता मी आपल्या निजायाच्या खोलींत गेलों व दुसऱ्या सकाळीं वेळेवर मला उठवावें असी चाकराला वर्दी देऊन दार लावून घेतलें. झोंपीं जावें तें टाकून मी आपल्या नामदानीच्या व हिऱ्याच्या विचारांतच गुंग झालों. मी मनांत ह्मटलें;—देवानें मजवर कृपादृष्टि फिरविली! आजपर्यंत जरी दुर्दैवानें माझी पाठ सोड-ली नव्हती, तरी या उपर मी भाग्यशाली राहीन. हं एथें एक हजार बुकत; ती एक वीनशें पिस्तोल मोलाची आंगठी! आणखी पाहिजे तें काय! बराच काळप-

र्यंत ही रोकड चालून आपले दिवस सुखानें निभतील. माजुलो खरोखर तोंडपूजा करणारा माणूस नव्हे, असा माझी पक्की खातरी झाली. वालादोलिदांतच जेव्हां इतकें, तेव्हां माद्रिडांत गेल्यावर तेथील बाया एकाच फुंकीसरसे अग्निमय होतील. नंतर औदार्य-शाली कामिलेची ममतादर्शक अनुसंधाने आपल्या सर्व मोहक भूषणांसह माझ्या मनांत उभी राहिली आणि दानराफेल आपल्या वाडींतील घरांत मला देण्यासाठीं ज्या मेजवानीची तयारी करीत होता, ती मी आगाऊ विचारांनींच चाखली. अशा ह्या आनंद-मूर्तींच्या घडणी चालल्या होत्या, तरी निद्राबाई आपलीं शय्यापुष्पें माझ्या पलंगावर विखरत होतीच. जशा जांभया देऊं लागल्या, तसा पोशाख उतरून मी झोंपायाला गेलों.

दुसऱ्या सकाळीं जेव्हां मी जागा झालों, तेव्हां दिवस रोजच्याहून कांहींसा अधिक वर आला, असे दिसले. मला मोठ्या पहाटेस उठवावें ह्मणून मी आपल्या चाकराला बजावून सांगितले होते, असे असतां त्यानें इतका उशीर होई तों आपलें मुखदर्शन केलें नाहीं, ह्मणून मी आश्चर्यांत पडलों. मला वाटलें कीं, बेटा आम्ब्रोज कदाचित देवळांत गेला असावा अथवा नजाणो, अपरात्रपर्यंत परमेश्वरपरायण विचारांत जागरण करून इतक्या उशिरांपर्यंत त्यानें आपली पथेरीही सोडली नसावी. कसेंही असो, बेट्यानें आज सकाळीं मला आळसी ठेवून आपणही आळशी झाला,

हे वाईट केलें, असें ह्मणून मी नाक मुरडलें. पण ह्या-हूनही अधिक वाईट अशा एका गोष्टीनें माझ्या मनावर लागलाच घाला घातला, ह्यामुळें आम्ब्रोजाच्या आळ-साबद्दल तर्क करण्याचें काम आपेआप बंद पडलें, आणि मी तटस्थ झालों. बिच्छान्यावरून उठलों व जामदानी ठेवलेल्या ठिकाणीं आहे कीं नाहीं, तें पाहूं लागलों, तों ती त्या ठिकाणीं दृष्टीस पडेना, व आस-पासही कोठें सांपडेना! ते भक्तिपरायण आम्ब्रोज बावा, एकाच रात्रींत ह्या अशाश्वत भवसागरांतून आ-मचा तारणोपाय व्हावा, अशा योजनेनें, आमचे सेवक होते, ते एकदम गुरु झाले, असें मला वाटलें. हा संशय खरा कीं खोटा, तें पहावें ह्मणून मी खोलीचें दार उघडून आम्ब्रोज, आम्ब्रोज, अरे आम्ब्रोज, अशा मोठ्या जोरानें त्या लुच्चाला बहुत हाका मारल्या, पण व्यर्थ. शेवटीं माझ्या हाकांचा कल्होळ सहन होईना ह्मणून एक ह्मातारा माणूस जवळ आला, आणि 'महाराज, आपली काय मर्जी आहे?' असें त्यानें मला विचारलें, व तुमची सर्व मंडळी मोठ्या पहाटेस दिव-साचा गोंदा फुटण्यापूर्वींच माझ्या घरांतून गेली,' असें सांगितलें. मी त्याला पुसलें:—'काय' तुझ्या घरां-तून? असें कसें? हें दानराफेलाचें घर नव्हे काय? तों ह्मणाला;—'कोण' दानराफेल? अशा एकाद्या गृहस्थाला तर मी नावानेंही जाणत नाहीं. हें आयतें सर्व तयारीचें माझें घर होय. काल संध्याकाळीं आप-ल्या येण्याच्या पूर्वी सुमारें एक तास ती तुमची सोब-

तीण बाई इकडे आली, आणि कोणीएक बडा गृहस्थ वेष पालटून फिरत आहे, यासाठीं सोईवार जागा पाहिजे, असें सांगून तिनें हा गाळ्याचागाळा भाड्यानें घेतला. माझ्या भाड्याचा पैसा तर तिनें पूर्वींच चुकविला.' मी आतां अगदीं गूढांत पडल्यासारखा झालों. कामिला व दानराफेल हीं कोणत्या योग्यतेचीं माणसें होतीं, हें मला स्पष्ट समजलें; आणि माझ्या चाकरानें प्रथमतः माझ्या कामाकारभाराची पक्की माहिती मिळवून नंतर मला ह्या दुष्ट ठक लोकांच्या हातीं दिलें, असा तर्क मी केला. कारण नसतां मूर्ख-पणानें मी माजूलोवर विश्वास ठेवून आपल्या कार-भाराची त्याला माहिती दिली, त्यामुळें माझा घात झाला; यासाठीं ह्या दुःखकारक गोष्टीबद्दल माझा मीच जबाबदार व्हावें हें योग्य होतें, पण ही जबाब-दारी मी आपल्या आंगावरून एकदम त्या गरीब निरुपद्रविक प्रारब्धाबाईच्या आंगावर लोटली आणि तिला पांचपन्नास गालिप्रदानें हांसडून अनिष्ट ग्रहां-सही निरनिराळ्या शेकडो विधानांनीं शाप दिले. ह्या माझ्या कर्मगतीचा इतिहास मी त्या आपल्या सर्व तयारीच्या बंगलेवाल्यास सांगितला. ह्या गोष्टींत माझ्या तर्फेनें जसा माझा भाग होता, तसा त्याच्या तर्फेनें त्याचाही भाग होता; पण त्यानें माझी हकीकत ऐकून बाह्यात्कारीं कांहींसें दुःख झाल्याचें चिन्ह दाखविलें. तो ह्मणालाः—'तुमची मला फार दया येते; माझ्या घरांत असी चेष्टा घडावी, हें माझ्या नांवाला मोठें

दूषण आणतें. जन्मादारभ्य असा मला कधीं लागला नव्हता. माझ्या दुर्दैवानें असी अप्रियगोष्ट घडली ह्मणून मी फार खट्टा होतों. माझ्या मनाची जी काय स्थिति झाली आहे, ती एका अंतरसाक्षी परमेश्वरालाच ठाऊक.' हें त्याचें सुभाषित कसेंही असो, पण माझी पक्की खातरी आहे कीं, ह्या ठकबाजींत बर्गासवाल्या माजूलोचा व ह्याचा सारखा वांटा होता. माजूलो चांगला बुद्धिमान कल्पक खरा! त्याबद्दल मी त्याला अलबत अग्रस्थपत्र देईन!

---

## भाग १७.

### सर्व तयारीच्या आयत्या घरांतून निघाल्यावर जिल्ब्लास कोणते उपाय योजितो.

मी, आपल्या दुःखाचे पहिले वेग निघून गेल्यावर व्यर्थ झुरत बसावें, त्यापेक्षां आलेल्या भोगास सादर रहावें हे बरें, असा विचार करूं लागलों. मी आपलें धैर्य परत खेचून घेतलें आणि विवेकानें चित्तास समाधानी आणून पोशाख करतां करतां मनांत ह्मणूं लागलों:—'अद्यापही मी मोठ्या दैवाचा आहें कीं, त्या लुच्चांनीं माझे कपडे व मजब्यांतील थोडेसे पैसे चोरले नाहींत इतकी तरी त्यांनीं मलाई दाखविली ह्मणून मी त्यांचे आभार मानतों. त्यांनीं मेहरबानी करून माझ्या मोज्यांलाही हात लाविला नव्हता. हे जोडे मी त्या परमात्म्याकडे जोड्यां मूळ किंमतीच्या

तृतीयांशानें दिले. शेवटीं त्या सर्व तयारीच्या आयत्या बंगल्यांतून मी पाय बाहेर काढले. ना ओझें ना पाझें, कीं ना गडी माणसांची दगदग! असा सडसडीत होऊन व त्याबद्दल ईश्वराचे आभार मानून चाललों. प्रथमतः मी आपल्या खेचरांस पहाण्यासाठीं त्यांच्या ठाणांवर गेलों. आम्ब्रोज त्यांना विसरला असेल, असा तर्क करण्यास तर जागा नव्हतीच; व हेंच खरें झालें. ह्याच्या चालचलणुकीबद्दल पहिल्यापासूनच जर मी याप्रकारें जपून विचार केला असता, तर माझें चांगलें झालें असतें. त्या खेचराला नेण्यासाठीं आम्ब्रोझानें उजाडण्याची सुद्धां वाट पाहिली नाहीं; मोठ्या अपरात्रीसच त्यांला सोडून नेलें, असें मला कळलें. शेवटीं जी माझ्या जामदानीची दशा, तीच त्या खेचरांची दशा, तीं परत माझ्या दृष्टीस पडतील अशी आशा उरली नाहीं, अशा विचारानें दुर्मुखला होऊन पुढें कोणता प्रकार योजावा त्याची विवंचना करीत करीत रस्त्यावरून चालूं लागलों. परत एकदां बर्गासाला जाऊन दोनामेन्शाची भेट घ्यावी, असें माझ्या मनांत आलें; परंतु असें केलें तर, त्या साध्वीच्या चांगुलपणाचा वाईट विनियोग केल्याबद्दल मी दोषी ठरेन, व दुसरें तशा याचनेनें आपला अवघा मूर्खपणा बाहेर पडेल, ही गोष्ट लक्षांत आणून तो विचार रहित केला. अतःपर स्त्रियांकडे फार खबरदारीनें वागेन, अशी शपथ मी वाहिली. मोठ्या पतिव्रतेच्या डौल घालणाऱ्या बायकाही माझ्या मतें

कारागृहांत जाण्याला चुकणार नाहींत. वारंवार माझे डोळे माझ्या बोटांतल्या त्या आंगठीकडे लागत. कामिलेनें बक्षीस दिलेली आंगठी खरें ही! ती पाहिल्याबरोबर माझ्या आंगाचा तिळपापड होई. मला वाटे;—अरेरे! मी कांहीं रत्नपारखी नाहीं, पण चोरींत न सांपडतां एका अर्थी चोरीसारखी अदलाबदल करणाऱ्या ह्या घेवाऱ्यांच्या अनुभवानें मी रत्नपारखी बनेन. ह्या आंगठीचें मोल करण्यासाठीं दुसऱ्या एकाद्या रत्नपारख्याकडे गेलें पाहिजे असें नाहीं. तो दुसरें काय सांगेल! 'तूं गाढव आहेस असें तो ह्मणेल. मला माझ्या हिऱ्यानें आपलें रूप दिसतें, तेवढें बस!'

असें जरी मला वाटलें, तरी त्या आंगठीची खरी किंमत समजण्याबद्दल माझ्या मनाची हुरहुर कमी होईना, ह्मणून हयगई न करितां मी ती आंगठी एका जवाहिऱ्याला दाखविली: त्यानें तिचें मोल तीन दुकत केलें. माझ्या अजमासाचीहि धांव ह्या पलिकडे नव्हती; तथापि त्या जवाहिऱ्याच्या तोंडचें मोल ऐकतांच माझा संशय निखालस फिटला, आणि तीं फिलिपैन बेटें, तेथला गव्हर्नर व ती त्याची भाची ह्या सर्वांला ह्यावेळीं विधियुक्त रीतीनें मी सैतानाच्या स्वाधीन केलें; ह्मणजे ही तुझी प्रजा तुलाच अक्षय्य असो, असें मी त्याला सांगितलें. मी त्या जवाहिऱ्याच्या दुकानांतून बाहेर पडत होतों, इतक्यांत एक तरुण मनुष्य मजकडे पाहिल्यासारखें करून एकाएकीं रस्त्यावर उभा राहिला, त्याच्या खाणाखुणा तर माझ्या ओळखी-

च्याशा वाटत, पण त्याचें नांव मला स्मरेना. शेवटीं तो मजकडे आला आणि ह्मणाला:—'जिलब्लास, असें कसें बरें! आपल्या जुन्या सोबत्याला ओळखण्यांत तुला लाज वाटते काय? अथवा दोन वर्षांतच 'हीं कशाचीं फळें!' अशी तुझी तऱ्हा झाली काय? तुझा गांवकरी व शाळासोबती फाब्रिशो ह्याची आठवण तुला नाहीं काय? डाक्तरगोदिनीजकडे आह्मी उभयतांही अध्यात्मविद्या व सृष्टिज्ञान ह्यांचा अभ्यास करीत होतों, त्याचें स्मरण तुला आहे?

हे शब्द त्याच्या मुखांतून बाहेर पडण्यापूर्वींच त्याला मी ओळखलें आणि मोठ्या प्रेमानें आह्मीं एकमेकाला आलिंगन दिलें. तो ह्मणाला:—माझ्या मित्रा, तुझ्या दर्शनानें मला जो आनंद झाला आहे, तो स्पष्ट करण्यास मला शब्द सुचत नाहींत. पण जिलब्लास हें कसें! मी खरोखरच ईश्वरास स्मरून सांगतों कीं, तूं तर आतां उमरावासारखा दिसतोस! सरदारी तरवार, रेशमी पायमोजे, मखमाली आंगरखा व प्रावरण व त्यावर रुपेरी कशिदा! काय छानही! छान नव्हे ही, हा रोग होय! तो ह्या जगांत मोठ्या जोरानें पसरत चालला आहे! मी पैज मारीन कीं 'तुला एकादी पैकेवाली ह्मातारीसी जन्मसवाशीण भेटली आहे!' मी ह्मटलें:—'तूं नुसत्या बाहेरच्या छानीवरून हें अनुमान करतोस, पण तसी कांहीं माझी स्थिति भरभराटीची नाहीं.' त्यानें उत्तर केलें कीं;—'असलें टंगळ मंगळ मजकडे चालणार नाहीं, मी चागलें समजतों: पण

तूं आपलें गुह्य उघड करूं इच्छीत नाहींस; आणि अरे, जिल्ब्लासा तें रे काय तुझ्या बोटांत? माझ्या धिटाई-बद्दल तूं मला क्षमा करशील तर मी तुला विचारतों:- तो छानदार हिरा कोठूनरे तुझ्या बोटांत आला? 'मीं सांगितलें:—तो एका पापी रांडेकडून आला? फाब्रिशो, माझ्या प्रियकर फाब्रिशो, ह्या वालादोलिदांतील बायांशीं एकजात संबंध नकोरे बाबा? माझ्या मित्रा, त्यांच्या थोड्याशा समागमानें मी आपलें होतें तें सगळें गमावून बसलों.'

हे शेवटील शब्द उच्चारतानां मी रडकुंडी परतल्या सारखा झालों, यावरून मला कोणी तरी पस्ताव्यांत पाडलें आहे, असें फाब्रिशोनें स्पष्ट जाणिलें. मी त्या रम्य स्त्रीजातीविषयीं इतका कां कंटाळलों, तें आपल्याला सांगावें ह्मणून त्यानें मला विनंती केली. मी तें त्याला तेथल्या तेथें त्या वेळींच सांगितलें असतें, पण गोष्ट पडली लांबट, आणि आह्मांलाही कोठें तांतडीनें जाण्याची घाई नव्हती, तेव्हां आह्मी एका काफीखान्यांत गेलों व न्याहारी आणविली. न्याहारी चालतां चालतां, ओविडोहून निघाल्यापासून माझ्या संबंधानें ज्या ज्या गोष्टी घडल्या, त्या सर्वांचा इत्थंभूत इतिहास मी त्याला दिला. त्यालाही त्या गोष्टी ऐकण्याची बरीच लहर आली होती; अर्थात् त्यानें लक्ष-पूर्वक माझी कथा श्रवण केली, आणि माझी उद्विग्नता पाहून त्याला दया आली. तो ह्मणाला :— 'माझ्या प्रिय मुला, ह्या आयुष्यांत जीं जीं अरिष्टें आपल्याला

घडतात, तीं तीं आपण मोठ्या धैर्यानें सहन करून त्यांतच सुख मानलें पाहिजे. गुणसंपन्न मनुष्य केव्हां तरी विपत्तींत असेल काय? तो सधीर अंतःकरणानें चांगल्या योगांची प्रतीक्षा करतो. सिसिरो असें ह्मणतो कीं, गुणसंपन्न सधीरमनुष्य कधींही आपलें मस्तक इतका ठेंगणा करणार नाहीं, कीं तो आपल्या मनुष्यपणास विसरेल. माझें तर मत असें आहे बाबा; व मी आपला वर्तनक्रमही तसाच ठेवितों. मी सुखांत किंवा दुःखांत केव्हांच बुडी मारीत नाहीं; पण सर्वदा दुर्दैवरूप सरोवराच्या सपाटीवर तरंगत असतों. तुला लहानसा एक दाखला सांगतों: ओविडोत असतांना एका चांगल्या घराण्यांतील मुलीशीं माझी प्रीति जडली; तीही मला चाहूं लागली, तेव्हां मी तिच्या बापाकडे तिचें मागणें केलें, पण त्यानें तें मागणें झिट्कारलें. आतां अशा परिणामावरून पुष्कळ तरुण मनुष्य विरहव्यथेनें जायां होतात; पण नाहीं! माझें धैर्य कसें तें पहा! माझें चित्त तिळमात्रही डगमगलें नाहीं. ह्मणून मी आपला बेत सोडला काय? नाहीं. मी तिला उठवून चालता झालों. ती मुलगी सुंदर, सरळबांध्याची, निष्काळजी व नखरेबाज होती. मी तिला सहा महिने पर्यंत गालिशाच्या आसपास राहून जवळ बाळगली; नंतर माझ्या मनांत प्रवास करावा असें आलें; ह्या संधीस पोर्तुगाल देशांत जाऊन दुसरी सोबत पाहावी, असें तिलाही वाटलें, व ती मला सोडून तिकडे गेली. एकदां लोकलज्जेचा

परित्याग करून व सर्व प्रकारचे पडदे उचलून जें माणूस अतूवर उदार होतें, त्याला घर काय व रस्ता काय? ह्या गोष्टीनें माझी निराशा अधिक वाढावी, पण मी ह्या नूतन दुःखाचा भार मुळींच आंगावर घेतला नाहीं. पहिल्यानें माझाच व्यवहार मूर्खपणाचा झाला, त्याबद्दल माझें मन मला खात होतें. अर्थात् तिचा वियोग मला सह्य होऊन मी स्वस्थ झालों. आम्हीं उभयतांही ओविडोहून जेव्हां निघालों, तेव्हां जिक-डून तिकडून खर्चापुरता पैसा गोळा केला होता. ह्या पैशापैकीं जें कांहीं उरलें होतें, तें घेऊन मी लिआनच्या राज्यांत गेलों व शहरों शहरीं हिंडून असलेला पैसा खर्चला. शेवटीं एकांडा एक दुकत मजकडे राहिला, तो घेऊन मी पालेन्सियाला आलों. हा दुकत मोडून त्यांतील कांहीं पैशानें मी बुटांचा जोड विकत घेतला. जें काय शेष राहिलें, त्यानें निभावणी लागेना, तेव्हां गोंधळांत पडल्या सारखा झालों. थोडे दिवस उपासमार झाल्यावर आतां कसे तरी हातपाय हालविल्या शिवाय गत्यंतर नाहीं, असें वाटून मी नोकरी पत्करण्याचा निश्चय केला. प्रथमतः मी एका लोंकरी कपडेविक्या व्यापाऱ्याकडे राहिलों. ह्या व्यापाऱ्याचें दुकान एका मोठ्या रस्त्यावर होतें; व त्याचा मुलगा चांगला ढबदार व मौजी होता. एथें माझ्या उपासरोगाला भंजक असी चांगली मात्रा मिळाली; पण माझें काम [illegible] ह्या मुलाला शिक्षक होतों. [illegible] त्या मुलाचा

पाठलाग करून त्याला शिकवावें असें होतें, पण तो बेटा मुलगा आपल्या बापाला तुरी देण्यासाठीं मोठ्या काकुळतीनें माझें सहाय मागे. आतां दोहोंतून कोणता तरी एक पक्ष घेतला पाहिजे. हुकमतीच्या शब्दांहून विनंतीचे शब्द गायनासारखे कानाला गोड लागतात; व मी पडलों गायनाचा शोकी, ह्मणून त्या मुलाच्या गायनास सर्वदा कान देऊं लागलों, ते त्याच्या बापास न आवडून त्यानें मला घराबाहेर काढून लाविलें. ह्या व्यापाऱ्याच्या मात्रेनें नुकतीशी माझी काया उजळत चालली होती, इतक्यांत कर्ग-तृतीच्या नादीं लागून उदरपूर्ति नाहींशी केली. माझा रोग परत उलट खाऊं लागला, तेव्हां एका वृद्ध चितान्याची नोकरी पत्करली. ह्या चितान्यानें ममतापूर्वक मला आपल्या कलेचीं मूलतत्वें शिकवण्या-चें काम मोफत पत्करलें. पण ह्या शिक्षणानेंच मला मरून काढण्यांत तो इतका उद्युक्त राही, कीं मला अन्न देण्यास विसरे. ह्याप्रमाणें छाया हीच वस्तु असें मानण्याचे प्रसंग वरचेवर येऊं लागले, तेव्हां मला पालेन्सियांत राहण्याचा कंटाळा आला, मी वाला-दोलदास आलों. एथें एका दवाखान्याच्या मुख्य अधिकाऱ्यानें मला नोकरीस ठेविलें; अजूनही मी त्याज-कडेच आहें. एथें मला चांगलें वसतिस्थान सांपडलें आहे, तेणेंकरून ह्या जगांत मी धन्य आहें असें मानतों. माझा धनी मन्वेलआर्दनेज़ हा भला व अत्यंत धार्मिक मनुष्य आहे. तो आपल्या हातांत एक

मोठी जपमाळ घेऊन हमेशा खालच्या मानेनें चालत असतो. लोक असे ह्मणतात कीं. तरुणपणापासून गोरगरीब लोकांची स्थिति लक्षांत आणण्याच्या कामाकडे ह्याचा अति निकट संबंध पडल्या मुळे तो तशा लोकांच्या स्थितीविषयी एकसारख्या उत्कंठेनें फार कळकळ वागवितो. धार्मिक मनुष्याला त्याचा धार्मिकपणाच सर्व सुखें घरच्या घरींच आणून देतो. माझ्या धन्याला कोणत्याही गोष्टीची उणीव नाहीं. जसजसा तो गोरगरीबांची दया अधिकाधिक आणतो, तसतसी त्याची लक्ष्मीही स्थीर व वर्धमान होत जाते.'

ह्या प्रमाणे फाब्रिशो आपली गोष्ट सांगत असता मध्येच मी त्याला बोललों कीं, तूं आपल्या सांप्रतच्या स्थितींत सुख मानून तृप्त राहातोस हे ठीक आहे, पण ह्याही पेक्षां तू दुसऱ्या कोणत्याही दिशेस चांगला प्रकाशमान होशील, असें तुझ्या बुद्धीवरून मला वाटते.' त्यानें उत्तर केलें:—'नाहीं, नाहीं, **जिल्ब्लास**, तू असें मानूं नको; माझ्या स्वभावाच्या मनुष्याला ह्याहून दुसरा अधिक चांगला प्रकार सांपडला नसता, हे तू खरें मान. खिदमतगारीचा धंदा एकाद्या भिकार निर्बुद्ध पोराला श्रमकारक खरा, पण बुद्धिमान व हुशार मुलाला त्याच धंद्यांत मोहनी सांपडते. श्रेष्ठबुद्धीचा मनुष्य जेव्हां नोकरी पत्करतो, तेव्हां तो मठ्या भोळानाथासारखा वागत नाहीं. तो धन्याचाही धनी होऊन बसतो, यःकश्चित् सेवकासारखा राहात नाहीं. आरंभीं तो आपल्याला नोकरीस ठेवणाराच्या पाठलटी

ची लांबी मोजतो; त्याच्या अंगीं जीं व्यंगें असतील तीं त्याच्या नजरेसमोर आणून त्याला वेळोवेळीं सहाय देतो व त्याचा विश्वास संपादन करतो आणि अंतीं त्याच्या नाकांत वेसण घालून त्याला स्वाधीन करून घेतो. माझ्या धन्याकडे माझ्या वर्तनाचा डौल असाच आहे. त्याची सर्व यात्रा कोणत्या सिद्धीसाठीं आहे, हें मी त्याच्या नेत्रावरून लागलेंच जाणलें; त्याची अवघी इच्छा इहलौकिक साधुत्वाकडे दिसली. त्याच्या इच्छे-प्रमाणें मीही त्याला साधुच मानतों, असा बाहाणा केला, कारण ढोंग करायाला खर्च लागत नाहीं. मी इतकेंच करून उगी राहिलों नाहीं: ह्यापुनही कांहीं मजला पुढें चाललों, कारण मीही त्याचाच कित्ता घेतला, आणि दुसऱ्या लोकांसमोर तो जसें करी, तसें मीही त्यासमोर करूं लागलों: त्या गांवठकास मी देशठक भेटलों आणि हळूहळू जसा घरधनीसाच झालों. कोणत्याही दिवसीं त्याच्या आश्रयाखालीं धर्म-पेटीची चावी ही माझ्या हातीं येऊन तत्संबंधीं कार-भार मला पाहावा लागेल, अशी आस्था मी करितों. असें झालें, तर मला व दुसऱ्यांलाही सुखप्राप्ति होईल; कारण ह्या कारभारांत माझ्या धन्याचें वर्तन कसें काय आहे, त्याबद्दल मला आपोआप शिक्षण मिळालेलें असून धर्मव्यवस्थेविषयीं कशी कळकळ वागवावी तें पूर्वींच माझ्या ध्यानांत येऊन चुकलें आहे.'

मी उत्तर केलें:—'माझ्या प्रियमित्रा फाब्रिशो, तुझ्या इच्छा फार मजेच्या आहेत; ह्या तुझ्या तुला अक्षय्य

असोत ! मी तर आपला पहिला बेत सिद्धीस नेऊं इच्छितो. मी हा लागलाच जातो आणि माझा रुपेरी कशिद्याचा पोशाख काढून टाकून त्याबद्दल झगेदार पोशाख घेतो. मी **सालामांकास** जाऊन तेथील **युनिव्हर्सिटी**च्या झेंड्याखालीं शिक्षकीचा पवित्र धंदा चालवीन.' ह्यावर **फान्सिशो** अंमळ मोठ्या आवाजानें ह्मणाला;—व: फार चांगला बेत ! उत्तमांत उत्तम ! खूपनामी कल्पना ! काय वेडेपणा हा ! अशा वयांत तूं पंतोजीपणा करूं इच्छितोस, नाहीं काय ? अरे मूर्खा, त्या धंद्याची तूं आवड धरितोस, पण त्यामुळें आपल्या. वर कोणतें संकट ओढून घेतोस, तें तुला कळतें ? ज्या ठिकाणीं तूं तो धंदा पत्करून राहशील, त्या ठिकाणचीं सर्व माणसें तुजवर एकसारखा पाहारा करतील; तुझें इवल्यानइवलें कृत्य बारीक नजरेनें ध्यानांत घेतील आणि तुला सर्वदा एकाद्या कैद्यासारखें राहावें लागेल. मनांत ढोंग व बाहेर सोंग करून तुला आपलें वर्तन ठेवलें पाहिजे; सद्‌गुणसंपन्नतेचा पोकळ डौल तूं ठेवूं लागशील. तुला आपल्या सुखासाठीं एका क्षणाचीही फुरसद मिळणार नाहीं; तुझा शिष्य तुला एकसारखे शाप देत राहील; त्याला व्याकरण शिकविण्यांत आणि तो छानछोकीविषयीं कांहीं तरी बोलला तर, त्यासरशीं ह्याला महान साधूचा डौल आणून दोष देण्यांत तुझे दिवस जातील. आणि इत. की खटाटोप काढून व कारागृहवास भोगून शेवटीं फलश्रुति कोणती? जर तुझा शिष्या गव्हार निघाला,

तर तूंच त्याला चांगलें लक्षपूर्वक शिकविलें नाहीं, असें अपयशाचें खापर ते तुझ्या डोईवर फोडतील; आणि तुला घराबाहेर काढून लावतील. कदाचित् तुझा मुशाहिरा देखील तुला चुकवणार नाहींत. या साठीं पंतोजीपणाच्या धंद्याबद्दल तूं मजकडे चकार शब्द काढूं नको; जीवदानाचें काम एका अर्थी सोपें, पण बाबा विद्यादानाचें काम अति बिकट. पाहिजे तर खिदमतगारीबद्दल तूं हवें तितकें बोललास तर मीं ऐकेन; तें बैठें वेतन खरें व त्यांत तुजवर जबाबदारी कोणतीच नाहीं. आपला धनी कदाचित् निर्मळ नसला, म्हणून काय झालें? जर आपण श्रेष्ठ बुद्धीचे माणूस आहोत तर त्याच्या त्या दुर्गुणांचीच वाहवा करून ते दुर्गुणच आपल्या कामीं पडत असें करूं. एकाद्या चांगल्या नांदत्या घराण्यांतील हुजऱ्या चैनीनें राहातो. पोटभर खाऊन पिऊन तो खुशाल स्वस्थ मनानें निजतो; त्याला आपल्या पोटखर्चाबद्दल कोणतीच ददात काढावी लागत नाहीं. कोणी का खर्च करीना? त्याला पोटभर अन्न, आंगभर वस्त्र आणि सुश्रांत झोंप इतकें कटकटीशिवाय मिळतें.

माझ्या प्रियमित्रा, ह्या नोकरीपासून जे फायदे आहेत, त्यांची मोजणी करूं लागलों, तर मला वेळच पुरणार नाहीं. जिल्ब्लासा, मी सांगतों तें खरें मान आणि पंतोजी होण्याबद्दल आपली मूर्ख इच्छा सोडून दे; माझा किसा घे.' मी उत्तर केलें;—फाब्रिशो, तूं लक्षाधीश तरीच कां होईना, पण तुझ्या धन्यासारखे

धनी रोजरोज मिळतात असें नाहीं; आणि यदाकदाचित् नोकरी प्रकरणाविषयीं मी निश्चय केलाच, तर निदान मला चांगली जागा मिळावी, असें मी इच्छितों.' तो ह्मणाला;– 'हं, आतां ठिक बोललास, तुझली तजवीज मला लागली. युनिव्हर्सिटीच्या जवळ्यांतून जर मला तुजसारखा नामी गडी ओढून काढायाला मिळतो, तर मी तुजसाठीं चांगली सुखाची जागा शोधून काढीन.

दारिद्र्य पूर्वींच दरवाज्याशीं येऊन ठेपलें होतें, याची भीति आणि ढळढळीत डोळ्यांसमोर दिसणारी फाब्रिशोची चांगली स्थिति ह्या दोन्हीं गोष्टींमुळें बहुधा याच्या उपदेशाचा ठसा जितका माझ्या मनावर उमटला, तितका कांहीं, त्यानें जी माझ्या मूळ बेताला बाधक व आपल्या सूचनेला साधक अशीं कारणें दाखविलीं, त्यांपासून उमटला नाहीं. सांप्रतच जिकिरींत पडलों होतों, तेव्हां मी हुजऱ्याचा पेहराव करावा, असा निश्चय केला. इतकें झाल्यावर त्या दुकानांतून आह्मीं बाहेर पडलों. माझा सोबती ह्मणाला;–'एथें एक गृहस्थ राहातो, त्याजकडे नोकरीच्या शोधार्थ फिरणारे गडी जात असतात, व त्यांना तो नोकरी लावून देत असतो. ह्या गृहस्थाकडे तुला मी नेईन. ह्या गृहस्थानें कित्येक कानोसेवाले ठेविले आहेत, ते प्रत्येक घरांत काय काय शिजतें, तें आपल्या धन्याला कळवितात. धनीही त्यांनीं दिलेल्या माहितीवरून कोणा कोणाची ऐपत कशी कशी आहे, व

कोणा कोणाला चाकरांची गरज आहे, त्याबद्दल नोंद ठेवितो व त्याची ती नोंद बिनचूक असते. हे फडनीस बावा एका कोणत्याशा मठांत धर्मोपदेशक आहेत. सारांश मला जी नोकरी लाविली, ती त्यानेंच.

अशा ह्या विचित्र कारखान्याबद्दल बोलत बोलत माझ्या सोबत्यानें मला एका आडगल्लीच्या रस्त्यांत आणलें. आह्मीं एका भिकार घरांत शिरलों; एथे सुमारें पन्नास वर्षांच्या वयाचा एक पुरुष आह्मीं पाहिला. हा एका मेजावर लिहीत बसला होता. आह्मीं त्याला आह्मांकडून होईल तितक्या नम्रतेने रामराम केला: त्यानें आह्मांला परत तर रामराम केला नाहीं, पण बसल्या ठिकाणींच राहून वर नजर न करतां उगीच मान हालविल्यासारखें केलें. त्यानें गर्विष्ठपणानें किंवा हमेशा त्याच्या दर्शनास येणारे हुजरे व गाडीवान, ह्यांचें आगतस्वागत करण्याची त्याला तसी साहजिक खोड पडली होती, ह्मणून असें केलें, तें समजलें नाहीं. माझा भरगच्ची रुपेरी कशिद्याचा रेशमी पोशाख पाहून मी चाकरी मागण्यास आलों होतों, असें कांहीं त्याला वाटलें नसेल; बहुधा मला चाकराची गरज असावी, असाच तर्क त्यानें केला असेल. पण आह्मीं त्याला फारवेळ संशयांत ठेविलें नाहीं. माझा मित्र **फाब्रिशो** एकदम पुढें झाला व ह्मणाला;—' महाराज **आर्यस** साहेब, मला परवानगी द्याल तर ह्या माझ्या जिवलग मित्राला आपल्याकडे रुजू करीन. हा तरुण मनुष्य चांगल्या लगतांचा आहे, पण अनिष्ट दशेमुळें

आज नोकरी पत्करण्याचें त्याच्या दैवीं आलें आहे कृपा करून त्याला आपण चांगलीशी नोकरी लावून द्याल, तर तो आपले उपकार विसरणार नाहीं. ह्यावर त्यानें मोठ्या शांततेनें असें उत्तर केलें कीं;— गृहस्थहो, तुम्हां सर्वांचा प्रकार असाच आहे; आपलें काम होण्यापूर्वीं तुम्हीं मोठमोठ्या बाता झोकतां; पण नंतर,—मी ईश्वरास स्मरून सांगतों,—तुम्हीं लागलेच विसरतां.' **फाब्रिशोनें** जबाब दिला कीं;— 'छी:' तर मग मजबद्दल तुमची केव्हांच कुरकुर नाहीं, हे कसें? तुमचें काम मी चांगलें केलें कीं नाहीं? **आर्यस** परत ह्मणाला; 'तें सर्व खरें, पण त्याहूनही अधिक चांगलें करण्याचें तुझ्या हातीं होतें. मी एकाद्या सरकारी कचेरींतील कारकुनाहूनही तुझी सोई चांगली लावून दिली; उगीच एकाद्या गरीब ग्रंथकर्त्यांवर तुझें ओझें पाडलें नाहीं.' एथें मी मध्यें झालों, आणि माझ्या सोबत्याला बोलूं न देतां **आर्यस** साहेबाला सांगितलें कीं;— 'महाराज, मी पाजी माणूस नाहीं, ह्याबद्दल आपली खातरी करण्यासाठीं हे दोन बुकत मी आपल्याला देतों, ते घ्यावे; इतक्यानेंच झालें असें नाहीं, जर आपण मला चांगलीसी नोकरी लावून द्याल, तर मी आपलाच आज्ञांकित असें समजा.

हा माझा रोखठोक व चोख व्यवहार त्याला मनापासून आवडला, असें दिसलें. तो ह्मणाला;—'कांहीं चांगल्या जागा खालीं आहेत. हो त्यांची यादी मजकडे आहे; यांतली कोणती जागा तुला पसंत पडते,

तें मला सांग.' इतके शब्द बोलून लागलीच त्याने आपला चष्मा नाकावर चढविला. मेजावरील नोंदवही उघडली, आणि तिचीं कांहीं पृष्ठें चाळून पुढे लिहिलेला तपसील मला वाचून दाखविला.

"कप्तान **तार्बेलिनो**ला एक हुजऱ्या पाहिजे; हा गृहस्थ उतावळा, शीघ्रकोपी, व तब्बियतो आहे; आपल्या नोकरांला वारंवार शिवी गाळ करतो, त्यांजकडून उगीच्याउगीच प्रमाणें करवितो, त्यांना लाता मारतो आणि हमेशा त्यांला डाग लावून सोडतो." हे वर्णन ऐकतांच हा कप्तान मुळींच मला नको, आपण दुसरे नांव वाचावें, असें मी त्याला सांगितलें. माझा बावरेपणा पाहून **आर्थस** साहेब हसला, आणि आपल्या पाठास लागला; '**दोनामेनु**ला, वयातीत श्रीमान विधवा, जिकीरखोर आणि चिकित्सक; हिला ह्याक्षणीं चाकराची गरज आहे; ती एकच चाकर ठेवीत असती, पण त्याला पुरते चोवीस तासही नांदवीत नाहीं. हिच्या घरांत चाकराचा एक पोशाख आहे, तो उंच किंवा ठेंगण्या, कसल्याही चाकराला बेताचा होतो. आजपर्यंत हा पोशाख सुमारें दोन हजार चाकरांच्या आंगावर चढला असेल, पण जशास तसा कोऱ्याचाकोरा आहे. **दाक्तर अल्वारफानेझाला** एक फेरीवाला गडी पाहिजे; हा वैद्यशास्त्रांत चांगला निष्णात व प्रसिद्ध गृहस्थ आहे. तो आपल्या कुटुंबाला सुहृया हातानें पोषितो, सर्व गोष्टीनें सुखी आहे आणि मुशाहिरेही मोठमोठे देतो; पण तो चाकराला कायम

करण्यापूर्वी नुसता अनुभव घेण्याविषयीं त्याजवांचून अमळ अधिक काळजी ठेवितो. ह्याच्या गड्यानें ह्याला खराब जिनसा आणून देतां नयेत, आणि खराब जिनसा आणून दिल्याबद्दल खटले तर वरचेवर होतात. अर्थात् नव्या चाकरांची परंपरा त्वरेनें लागती."

हें वर्णन ऐकून **फाब्रिशो**ला फार हंसें कोसळलें: तो ह्मणालाः—'हां, हां, हें सर्व तंतोतंत खरें आहे, त्या बद्दल मला मुळींच संशय नाहीं. खरें खुरेंच आपण आपल्या गिऱ्हाइकाचें चांगलें मौजेचें वर्णन देतां.' **आर्यस** साहेब ह्मणाला:—"**दोनाआल्फोन्सा**,एक ह्मातारी भक्तीण ही गेल्या तीन आठवड्यां पासून एका चाकराच्या शोधांत आहे; ही सुमारें आपल्या वेळाचे दोन तृतीयांश देवळांत घालविती, आणि चाकर तर हिला नेहमी आपल्या पदरास बांधलेला पाहिजे. **सनदकरी सिदिलो** देवळा कडील एक ह्मातारा कामदार; ह्यानें कालच आपल्या चाकराला काढून लाविलें'—पुढें वाचणार होता, इतक्यांत **फाब्रिशो** मध्येंच बोलला;— 'थांबा, महाराज तेथेंच थांबा, आह्मी देवळालाच चिकटून राहूं. **सनदकरी सिदिलो** माझ्या धन्याचा मित्र आहे; मी त्याला चांगलें ओळखतों. त्याजकडे **जासिंथा** नामें एक ह्मातारी ढोंगी बायको घरखटलें सांभाळण्यासाठीं होती; सर्व कुटुंबाच्या धनिणीसारखीच ही असे. **वालादोलिदांत** जीं जीं उत्कृष्ट घराणीं आहेत, त्यांपैकींच हें एक घराणें होय. एथें खुशाल यथास्थित खावें, प्यावें आणि आळसानें आयुष्य घालवावें. ह्या शिवाय तो

म्हातारा वातवद्ध आणि अशक्त आहे, तेव्हां बहुत करून आपलें मृत्युपत्र लौकरच करील असें वाटतें: आपल्या चाकरासाठीं मृत्युपत्रांत तो इनाम लिहील, ही आस्था आहेच.' नंतर मजकडे वळून म्हणाला;–'खरेंच गड्या **जिलब्लासा**, आपल्या सारख्या एकाद्याला ही भण पडेल! आतां आपण एका क्षणाचाही विलंब न लाविता अगोदर त्या सनदकऱ्याच्या घरीं जाऊं. मी स्वतःच तुला त्याजकडे रुजू करीन आणि तुला शिफारसही देईन. इतकें बोलणें संपतांच ही उत्कृष्ट सधी बक्षीस साधावी म्हणून मोठ्या घाई घाईनें **आयम** साहेबांची रजा घेऊन आम्ही लागलेच चालते झालों. **आयम** साहेबानें माझा सचकार घेतला होता, म्हणून हें संधान साधलें नाहीं तर, दुसऱ्या कोणत्याही चांगल्याशा स्थळीं आपण माझी सोई करीन असें अभिवचन दिलें.